

नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

जुलै - २०१७





जितेंद्र साळुंखे


अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७०। अंक १०। जुलै २०१७
आषाढ/श्रावण शके १९३९
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले, तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य-शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका








# नवभारत

## जुलै २०१७

## अनुक्रमणिका












# डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर

राजेंद्र डोळके

**प्रास्ताविक —**

डॉ. केतकरांना महाराष्ट्र एक अजोड विद्वान, तीव्र बुद्धिमानी आणि ज्ञानकोशासारखा अजस्त्र ग्रंथ हाती घेऊन पार पाडणारे दिर्घोद्योगी ग्रंथकार म्हणून ओळखतो. या त्यांच्या वाङ्मयकिर्तीबरोबरच एक विक्षिप्त आणि बेफिकीर व्यक्ती म्हणूनही त्यांची ख्याती झाली होती. त्यांचे व्यक्तिगत आयुष्य हे अत्यंत आश्चर्यकारक आणि लोकविलक्षण घटनांनी भरलेले होते. त्यांनी केलेले कार्य एवढे प्रचंड आहे की, पुढच्या अनेक पिढ्यांसाठी ज्ञानाची आणि माहितीची बैठक त्यांनी उत्तम रीतीने तयार करून ठेवली आहे. अवघ्या बावन्न-त्रेपन्न वर्षांच्या आयुष्यात त्यांनी निर्माण केलेली अफाट साहित्यसंपत्ती पाहिली की, एका जेष्ठ साहित्यिकाने त्यांचा 'एक बुद्धिवादी अजस्त्र यंत्र' असा जो उल्लेख केलेला आहे, तो अगदी यथार्थ आहे असे वाटते. अशा त्यांच्या हिमालयाएवढ्या साहित्याचे मूल्यमापन व कष्टप्रद जीवनाचे चित्रण हा एक बृहत्ग्रंथाचाच विषय आहे. त्याला आठ-दहा पानांच्या लेखात बंदिस्त करणे हा खरोखरच त्यांना अन्याय करणे होय. परंतु अलीकडच्या वृत्तपत्रांच्या व मासिकांनी घालून दिलेल्या पृष्ठमर्यादांमुळे तसेच करणे भाग आहे. सर्वप्रथम त्यांचे संक्षिप्त चरित्र वाचकांसमोर ठेवतो. त्यामुळे आयुष्याच्या कोणत्या वळणावर त्यांची कोणती व कशी साहित्यनिर्मिती झाली हे कळून येण्यास मदत होईल.

**चरित्राची संक्षिप्त रूपरेषा**

कोकणात दाभोळजवळ अंजनवेल नावाचे जे गाव आहे ते केतकर घराण्याचे मूळ गाव होय. केतकरांचे वडील व्यंकटेशपंत हे पोस्टखात्यात मास्तर होते आणि नोकरीनिमित्त भटकता भटकता ते कोकणापासून खूपच दूर गेले. महाराष्ट्राच्य अगदी ईशान्य टोकाला मध्यप्रांतातील रायपूर या गावी असताना दि. २ फेब्रुवारी १८८४ रोजी डॉ. केतकरांचा जन्म झाला. पुढे व्यंकटेशपंतांचे निधन झाले. त्या वेळी केतकर केवळ चार-पाच वर्षांचे होते. व्यंकटेशपंतांच्या निधनानंतर आई लक्ष्मीबाई आपले बि-हाड घेऊन मुलांसह अमरावतीला आपल्या दीराकडे आल्या. लहानपणापासूनच केतकरांची वाढ स्वैर रीतीने झाली.

प्राथमिक दुस-या इयत्तेपासून प्रवेश परीक्षेपर्यंतचे केतकरांचे शिक्षण अमरावतीस झाले. आपल्या हुशारीमुळे ते शाळेत उठून दिसत होते. महानुभाव संशोधक डॉ. य. खु. देशपांडे, वीर वामनराव जोशी व कादंबरीकार बाळकृष्ण संतुराम गडकरी हे त्यांचे शालेय सहाध्यायी होते. शाळेच्या वेळाव्यतिरिक्त ते अफाट वाचन करीत. माहितीत आणि बहुश्रुतपणात त्यांचा हात धरील असा विद्यार्थी त्यावेळी नव्हता. जसे हुशारीत त्यांचे नाव गाजत होते तसेच विक्षिप्तपणातही त्यांचे रंग त्याच वयापासून दिसायला लागले होते. त्यांची आई वारली त्या वेळी ते विशेष असे काहीच झाले नाही अशा अविर्भावात दुस-या दिवशी शाळेत हजर झाले होते.

आपले महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या राष्ट्रीय वातावरणात फर्ग्युसन महाविद्यालयात व्हावे अशी केतकरांची फार इच्छा होती. परंतु काकांच्या इच्छेपुढे काहीही न चालून त्यांना मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात दाखल व्हावे लागले. १९०१ ते १९०५ अखेरपर्यंत, संपूर्ण पाच वर्षे ते या कॉलेजमध्ये होते. परंतु त्यांचे मन तेथे रमेना. वर्गातील पुष्कळशा तासांना आणि विशेषतः गणिताच्या तासांना बुट्टी मारून केतकर खोलीवर जात आणि इतिहास, वाङ्मय, राजकारण, रोमन कायदा वगैरे विषयांच्या वाचनात दंग होऊन राहात.

कॉलेजातील शिक्षणानंतर केतकरांना परदेशात जायची इच्छा होती. परंतु त्यांच्या काकांची तशी इच्छा नव्हती. शेवटी केतकरांनी काकांना नाना प्रकारच्या धमक्या दिल्यानंतर कसेबसे काका तयार झाले आणि केतकर दि. १५ एप्रिल १९०६ रोजी करसलेही ध्येय नसताना, खिशात पैसे नसताना केवळ परदेशात जायचे ह्याच ओढीने अमेरिकेस जाण्याच्या बोटीमध्ये बसले. दि. १

अनुक्रमणिका








जून १९०६ रोजी ते न्यूयॉर्कला येऊन पोचले. दि. २ मे १९११ पर्यंत अशी एकूण पाच वर्षे केतकर अमेरिकेत होते. बिकट आर्थिक परिस्थितीला तोंड देण्यासाठी त्यांना स्वावलंबनाची कास धरणे प्राप्तच होते. त्यामुळे अभ्यास सांभाळून मिळतील ती कामे ते करीत असत. स्वप्रतिष्ठा पार गुंडाळून ठेऊन ताटवाट्या साफ करण्याचे आणि विद्यापीठातील विद्यार्थ्यांना वाढण्याचे कामदेखील त्यांनी केले. अमेरिकेत जाताच कॉर्नेल विद्यापीठात त्यांनी नाव दाखल केले आणि याच विद्यापीठातून १९०७ साली बी. ए., १९०८ साली एम्. ए. आणि १९११ साली पीएच्. डी. झाले. परदेशातील या वास्तव्यात केतकरांनी अफाट वाचन केले. आठ लाख ग्रंथ असलेल्या कॉर्नेल विद्यापीठाच्या प्रचंड ग्रंथालयात चार वर्षे जवळजवळ ते मुक्कामासच होते.

मे १९११ मध्ये ते परतीच्या मार्गाला लागले. वास्तविक पहाता ते जर अमेरिकेत स्थायिक झाले असते तर तेथे प्राध्यापकाची स्थायी नोकरी मिळून जन्मभर ते सुखात राहू शकले असते. परंतु, त्यांचा देशाभिमान त्यांच्या स्वार्थापेक्षा मोठा ठरला आणि ते हिंदुस्थानात परत येण्यास निघाले. वाटेत इंग्लंडमध्ये ते उतरले आणि तेथे ते सप्टेंबर १९१२ पर्यंत राहिले. इंग्लंडात त्यांची सांपत्तिक स्थिती फारच हलाखीची होती. बरेचदा 'बस' पुरतेही पैसे त्यांच्याजवळ नसत तर अनेकदा एकाच जेवणावर दिवस काढण्याची पाळी त्यांचेवर येई. भारतात परतल्यानंतर कलकत्ता विद्यापीठात त्यांनी प्राध्यापकाची नोकरी स्वीकारली परंतु त्यांच्या स्वभावामुळे वर्षभरानंतर त्यांना ती नोकरी सोडून द्यावी लागली.

कलकत्ता सोडल्यानंतर मे १९१४, मध्ये केतकर मुंबईला गेले, तेथून काँग्रेसच्या अधिवेशनासाठी मद्रासला गेले आणि १ जानेवारी १९१५ रोजी ते सिलोनमध्ये प्रवासास गेले. तेथे काही काळ कार्य करून ते नागपूरला पोचले. तेथे दोन व्याख्याने त्यांनी दिली. ती बरीच गाजली. यानंतर ते व-हाडभर हिंडले आणि व्याख्याने दिली. १९१५ च्या अखेरीस त्यांनी मराठी ज्ञानकोशाचे काम हाती घेतले आणि पुढची बारा-तेरा वर्षे त्यात गढून गेले.

लंडनमध्ये असताना कु. ईडिथ व्हिक्टोरिया कोहन या जर्मन ज्यू स्त्रीशी त्यांचा संबंध आला होता. पुढे त्याचे प्रेमात रूपांतर झाले. ज्ञानकोशाच्या कामासाठी त्या भारतात आल्या होत्या. दि. २१ मार्च १९२० रोजी व्रात्यस्तेमविधीने हिंदू झालेल्या कु. कोहनशी केतकरांनी विवाह केला. लग्नानंतर कु. कोहन यांचे नवे नाव शीलवती असे ठेवण्यात आले. लग्न झाल्यानंतर या दाम्पत्त्याला बरेच वर्षे मूल झाले नाही. तेव्हा १९२४ च्या मे महिन्यात त्यांनी दामोदर हरी बापट या चार वर्षांच्या बालकाला दत्तक घेतले. परंतु अगदी तान्ह्या मुलाच्या प्रतिपाळाची हौस शीलवती केतकर यांना होती. म्हणून मुबईच्या 'कामा ॲण्ड अल्ब्लेस हॉस्पिटल'मधून नुकतीच जन्मलेली एक मुलगी त्यांनी दत्तक घेतली. हिचे नाव वीरा. १९२२-२३ च्या सुमारास पुण्याला डेक्कन जिमखान्यावर त्यांनी स्वतःचे घर बांधले. त्याला 'आशास्थान' हे नाव त्यांनी ठेवले. परंतु ह्या विभागात डास असल्यामुळे शीलवतीबाईंना हिवताप झाला आणि त्याने घाबरून जाऊन त्यांनी हे ठिकाण सोडून देऊन आपले बि-हाड लष्कर विभागात हलविले.

महाराष्ट्रिय ज्ञानकोशाची जी महान कामगिरी त्यांनी बजावली होती तिचा गौरव करण्यासाठी हैद्राबादला १९३१ साली झालेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद त्यांना दिले गेले. ज्ञानकोशानंतर त्यांनी अनेक उलाढाली केल्या मासिक, दैनिक यांची निर्मिती केली. काही काळ राजकारणही केले. परंतु हे सर्व अल्पजीवी ठरले. केतकरांना बरीच वर्षे मधुमेहाचा त्रास होता. हा रोग वाढू नये म्हणून ते काळजी घेत आणि आपले अहर्निश वाङ्मयनिर्मितीचे कार्य चालू ठेवत. १९३७ च्या मार्च महिन्यामध्ये मधुमेहाने उचल घेतली. त्यातच त्यांच्या फाटक्या पादत्राणामुळे त्यांच्या पायाला जखम झाली. त्यात सेप्टिक झाले आणि त्यांना ससुन हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आले. तेथे त्यांच्या जखमेवर शस्त्रक्रिया करण्यात आली. पण, असे म्हणतात की, त्यांच्या आजाराचे योग्य काळजी घेण्यात आली नाही. ते बेशुद्धीत गेले आणि दि. १० एप्रिल १९३७ रोजी रात्री दहाच्या सुमारास मृत्यूने त्यांना गाठले.

केतकरांनी त्यांच्या कादंब-या व ज्ञानकोश सोडून सुमारे २० ग्रंथांचे व अनेक संशोधनलेखांचे लिखाण केले आहे. त्यांच्या समग्र लेखनाचा विचार एका लहानशा

लेखात करणे अशक्य असल्याने, महत्त्वाच्या ग्रंथांचाच तेवढा विचार करू.

**'दि हिस्टरी ऑफ कास्ट इन इंडिया' (भाग १)**

केतकर प्रखर देशाभिमानी होते आणि समाज-शास्त्राकडे त्यांचा विशेष ओढा होता. या दोघांच्या मिश्रणातूनच त्यांच्या डॉक्टरेटच्या पदवीच्या विषयाची निर्मिती झाली. एकराष्ट्रीयत्त्व टिकवायचे असेल तर जातिभेदाचे उच्चाटन केले पाहिजे याकरिता समाजशास्त्राचा पायाशुद्ध अभ्यास करण्यावाचून गत्यंतर नाही या जाणीवेतून पीएच्. डी. च्या अभ्यासासाठी त्यांनी जातिसंस्थेचे संशोधन ह्या विषयाची निवड केली. या प्रबंधात त्यांनी मनुस्मृतीची ऐतिहासिक छाननी केली आणि तत्कालीन सामाजिक परिस्थितीचे, विशेषतः जातिसंस्थेचे स्वरूप अत्यंत कुशलतेने स्पष्ट करून दाखविले. मनुस्मृतीचा ऐतिहासिक अर्थ कसा लावावा हे विशद करून ख्रिस्तोत्तर २२७ ते ३२० हा नवा कालखंड त्यांनी मनुस्मृतीचा ठरविला. आज जी सामाजिक परिस्थिती दिसते आहे, त्याहून फारशी वेगळी परिस्थिती मनुस्मृतीकाळी नव्हती हा निष्कर्ष त्यांनी काढला. त्यांच्या या निष्कर्षांनी प्रस्थापित मतांना जोराचे धक्के दिले. या प्रबंधाला 'जाती व मानववंशशास्त्र' या नावाचे एक परिशिष्ट त्यांनी जोडले आहे. ते मूळ प्रबंधाइतकेच मूलगामी आहे. हा सर्वच प्रबंध इतका मूलगामी आणि उच्च दर्जाचा आहे की, तो एका पंचविशीतील तरुणाने लिहिला यावर विश्वास ठेवणे जड झाले. एवढ्या लहान वयात फार मोठ्या पंडितांचे लक्ष वेधून घेतलेले दुसरे उदाहरण क्वचितच आढळेल. ह्या प्रबंधाचा पहिला भाग वरील नावाने १९०९ साली अमेरिकेत प्रसिद्ध झाला.

**'An Essay on Hinduism - its formation and future'**

दुसरा भाग वरील नावाने इ. स. १९११ मध्ये लंडनमध्ये प्रसिद्ध झाला. 'हिस्टरी ऑफ कास्ट'चा प्रथम खंड लिहून झाल्यानंतर ते स्वस्थ बसले नाही. जातिसंस्था आणि हिंदू समाज यांचे स्वरूप आणखी समजून घेण्यासाठी ते धडपडत राहिले. या विषयाबद्दलचे त्यांचे चिंतन इतक्या वेगाने झाले की जातिसंस्थेचा इतिहास आणि हिंदू समाजाचे पुनर्घटन यांबद्दलचे स्पष्ट चित्र त्यांच्या मनात निर्माण झाले. हिंदू समाजाची घटना आणि पुनर्घटना यासंबंधीच्या सा-या कल्पना त्यांनी या ग्रंथामध्ये व्यक्त केल्या. वर्णातून जाती निर्माण झाल्या ही समजूत पार धूडकावून लावून त्यांनी अशी मांडणी केली की जाती वर्णातून उत्पन्न न होता वेगवेगळ्या टोळ्यांमधून उत्पन्न झाल्या. आपसातील भांडणामुळे परस्परात लग्ने न करता त्या आपल्याआपल्यातच लग्ने करू लागल्या आणि कालांतराने त्यांचे रूपांतर जातींमध्ये झाले. पुढे पावित्र्याच्या फाजील कल्पनांमुळे जातींमधील उच्चनीच भाव उत्पन्न झाला. आजचा हिंदू समाज जातींनी कितीही असंघटित झालेला व चिरुफाळलेला असला तरी तो पूर्वीपेक्षा नक्की अधिक संघटित आहे. असे ते म्हणतात. वर्ण म्हणजे एक त-हेचे 'वर्ग' होत. जगदैवत्याची कल्पना मांडताना ते म्हणताना, 'मानवसमूह दूरदूर जाण्याचा जगाच्या इतिहासातील कालखंड संपला आहे आणि कित्येक शतकांपूर्वी हे समूह जवळजवळ येण्यास प्रारंभ झाला आहे. आता दळण वळणाचे मार्ग आणि साधने वाढत आहेत, त्यामुळे प चात्य आणि पौर्वात्त्य जगात वेगाने देवाण-घेवाण चालू आहे. सानिध्याने किंवा सानिकर्षाने समान संस्कृतीचा प्रसार होईल आणि त्या पद्धतीने जग एक होईल. जगदैक्याचे भवितव्य अटळ असल्यामुळे त्यादृष्टीने हिंदू समाजाची पुनर्घटना तो जागतिक समाजात चपखल बसेल अशा रितीने केली पाहिजे. ह्या निर्णयापर्यंत ते आले होते. केतकरांच्या त्या कल्पनेने किती झपाट्याने मजल मारलेली आहे, हे आपल्याला दिसतच आहे. त्यावरून केतकर किती दूरदर्शी होते हे आपल्याला कळून येते.

**महाराष्ट्रीय ज्ञानकोश**

कलकत्ता विद्यापीठातील नोकरी सोडून दिल्यानंतर मराठीत ज्ञानकोश काढण्याचे कार्य त्यांनी स्वतःकरिता निश्चित केले. १९०८ साली ते अमेरिकेत हॉर्वर्ड विद्यापीठात शिकत असताना कोशनिर्मितीच्या कार्याशी केतकरांचा थोडाबहुत परिचय घडला होता आणि तेव्हापासूनच कोशनिर्मितीचे विचार त्यांच्या मनात घोळत होते. 'एन्सायक्लोपीडीया ब्रिटानिका' या कोशग्रंथाच्या आवृत्त्यामागून आवृत्त्या निघून त्याची जी अकरावी प्रचंड आवृत्ती १९११ साली निघाली त्यामुळे भारतीय विविध

भाषांतही कोश तयार व्हावे अशा इच्छेने निरनिराळ्या भारतीय भाषांत ज्ञानकोश तयार झाले. महाराष्ट्रात केतकरांसारखी कर्तबगार व विद्वान व्यक्ती या कार्यासाठी इ. स. १९१५ - १६ मध्ये पुढे सरसाविली.

१९१५ ऑगस्टच्या सुमारास ज्ञानकोशाची कल्पना केतकरांनी प्रथम नागपूरला मूर्त स्वरूपात विद्वानांच्या बैठकीमध्ये मांडली. बहुतेकांनी ही कल्पना फाजील महत्त्वकांक्षी व हास्यास्पद म्हणून उडवून लावली. लोकमान्य टिळकांनी 'हे कार्य जवळजवळ अशक्य-कोटीतील किंवा अत्यंत कठीण आहे' असे उद्‌गार काढले. इतिहासाचार्य राजवाड्यांनी असे भविष्य वर्तविले की, हे कार्य परिपूर्ण होण्यास एक हयात खर्ची पडेल. पण दुर्दम्य आत्मविश्वास, अफाट विद्वत्ता आणि अवाढव्य उद्योग यांच्या बळावर त्यांनी हा प्रचंड प्रकल्प तडीस न्यावयाचे ठरविले.

दि. २६ जानेवारी १९१६ रोजी नागपूर येथे वॉकर रोडच्या कोप-यावर श्री. दाते यांच्या घरात त्यांनी भाड्याने जागा घेतली आणि तेथे ज्ञानकोशाचे कार्यालय थाटले. पुण्यासारखे विद्येचे माहेरघर सोडून त्यांनी कार्यक्षेत्र म्हणून नागपूरची ही जी निवड केली त्यामागे व-हाडमध्यप्रांत ही केतकरांची जन्मभूमी असल्यामुळे नागपूरविषयी केतकरांना विशेष प्रेम होते, हे कारण होते. त्यांनी ज्ञानकोशाची 'लिमिटेड कंपनी' स्थापन केली व त्याचे भागीदार करून त्याद्वारे भांडवल निर्माण करावे अशी योजना केली. त्याचबरोबर ज्ञानकोश खपवण्याकरिता विविध सवलतीच्या योजनाही त्यांनी राबवल्या. पुढे १ एप्रिल १९१८ रोजी ज्ञानकोश मंडळाची एक शाखा त्यांनी पुणे येथे उघडली आणि पुणे येथे नागपूरपेक्षा चांगला प्रतिसाद मिळाल्याने पुण्याची शाखा हीच पुढे केंद्रशाखा बनली. ज्ञानकोशामध्ये डॉ. केतकर यांच्याव्यतिरिक्त श्री. यशवंत रामकृष्ण दाते यांचे संपादकीय कार्यव्यवस्थापक म्हणून तर सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, चिंतामण गणेश कर्वे, लक्ष्मण केशव भावे, चिंतामण भट्टशंकर दातार, भास्कर गोपाळ नेने, मिस्‌. एच. कोहन इत्यादींचे उपसंपादक म्हणून नावे आढळतात. पुढे ग्रंथात असलेल्या विषयशाखांच्या संपादकांची नावे दिली आहेत.

ज्ञानकोशाचे तीन खंड असून ते २३ विभागात विभागलेले आहेत. डबल मी आकाराचा सरासरी ५०० पृष्ठांचा एकेक विभाग आहे. प्रस्तावनाखंड, शरीरखंड व पुरवणी खंड असे याचे तीन खंड आहेत. पहिल्या पाच विभागांचा प्रस्तावनाखंड असून केतकरांच्या सूक्ष्म आणि प्रगाढ पांडित्याची प्रचिती आणून देणारा हा खंड आहे. 'हिंदुस्थान आणि जग', 'वेदविद्या', 'बुद्धपूर्व जग' 'बुद्धोत्तर जग' व 'विज्ञानेतिहास' असे या खंडाचे पाच विभाग आहेत. विभाग ६ ते २१ हा 'शरीरखंड' ह्या नावाने प्रसिद्ध आहे. अकारविल्हेने येणारा मजकूर या खंडांत आला आहे. तिसरा खंड हा २२ व २३ ह्या दोन भागात असून 'सूचीखंड' व 'हिंदुस्थानखंड' अशी नावे त्याला देण्यात आली आहे.

ज्ञानकोशाचे काम बारा-तेरा वर्षे चालले. ह्या काळात केतकर ह्या विषयाने एवढे झपाटले होते की, त्यांचे नाव 'श्रीधर व्यंकटेश केतकर' याऐवजी 'श्रीधर व्यकटेश ज्ञानकोशे' असे पडले होते. जवळ पैसा नसताना एवढे अजस्त्र काम एकट्या माणसाने केले हे पाहून छाती दडपल्यासारखे होते. पण दुर्दम्य इच्छाशक्ती, कमालीची जिद्द आणि विलक्षण महत्त्वकांक्षा यांच्या भरवशावर केतकरांनी हे कार्य करून पुढील कोशकारांसाठी आयती पायवाटच तयार करून ठेवली.

**'प्राचीन महाराष्ट्र'**

ज्ञानकोशाच्या व्यापामधून १९२६-२७ च्या सुमारास मोकळे होताच केतकरांनी प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास रचण्याच्या जगड्‌व्याळ कामास हात घातला. हा बृहत्‌ग्रंथ ५०० पानांच्या ५ खंडांमध्ये प्रसिद्ध होणार होता. परंतु, त्याचा पहिलाच भाग (शातवाहनपर्व) हा इ. स. १९३५ मध्ये त्यांच्या हयातीत प्रसिद्ध होऊ शकला. या विभागात महाराष्ट्राचा शकपूर्व इतिहास व आनुषंगिक भारतीय व जागतिक इतिहास यामधील शे-सव्वाशे विविध विषयांवर लिहून आपले अभिनव सिद्धान्त मांडले आहेत. या विभागात त्यांनी असे मानले, की ख्रिस्तपूर्व तिस-या सहस्त्रकात महाराष्ट्रामध्ये वसाहती झाल्या आणि त्या माने, बेडर, कोळी, भोई, महार व रट्ठ वगैरे लोकांनी केल्या. कुरूयुद्धापासून म्हणजे ख्रिस्तपूर्व १५०० च्या सुमारापासून शकारंभापर्यंतचा इतिहास अनेक बारीक-सारीक तपशील देऊन साधार ग्रथित केला आहे. त्यामध्ये महाराष्ट्रावरील

निरनिराळी आक्रमणे यांसारखी राजकीय, 'मग' नामक इराण्यांचा वृत्तांत यांसारखी समाजविषयक माहिती आली आहे. तसेच त्यांनी या खंडात बृहत्कथेतील कथा व चित्रेही दिली आहेत. थोडक्यात हा खंड केतकरांच्या किर्तीला साजेसाच होऊन वाचकाला आश्चर्यचकीत करणारा झाला आहे.

तथापि यातील सिद्धान्ताची मांडणी केतकरांनी मनमानेल आणि विस्कळीत स्वरूपात केलेली असल्यामुळे त्यातून सुसंगत अर्थ काढताना वाचकांची त्रेधातिरपिट उडते. त्यामुळे या ग्रंथावर टिकाही बरीच झाली. केतकरांनी उपलब्ध पुराव्यांचा एकांगी अर्थ लावला, एका कच्च्या पुराव्यावर दुस-या कच्च्या पुराव्याची वीट रचून त्यावर इमारत उभारली, प्रस्थापित सिद्धान्तांकडे दुर्लक्ष केले, पुराव्याची मोहरी सापडली की, कल्पनेने तिचा मेरू बनवावा, अनेक कल्पना गृहीत धरल्या आहेत पण त्यांचा परस्परसंबंध स्पष्ट केला नाही. अनेक विधानांना करणे दिली नाहीत अशा प्रकारे टीका त्यांच्या ग्रंथावर झाली. साहजिकच त्यांचा हा ग्रंथ प्रथितयश टीकाकारांच्या थट्टेच्या आणि उपहासाचा विषय झाला.

असे जरी असले तरी त्या ग्रंथाचे महत्त्व विद्वानांना अमान्य करून चालण्यासारखे नव्हते. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक वाङ्मयात त्याने वैशिष्ट्यपूर्ण भर घातली आहे, हे निश्चित. त्यातील सिद्धान्त वादग्रस्त असले तरी ते खोडून काढण्याकरता तेवढ्याच तोलामोलाचा विद्वान असणे आवश्यक आहे. संशोधकाचा मोठेपणा यातच असतो की, त्याने केलेले संशोधन हे कितीही वादग्रस्त असले तरी ते विचारांना चालना देणारे असते, सत्याच्या अधिक जवळ नेणारे असते.

'प्राचीन महाराष्ट्रा'च्या या खंडाप्रमाणेच आणखी चार खंड निघावयाचे होते. त्यांचा हस्तलेख तयार करण्याचे काम त्यांनी सतत चालू ठेवले होते. अव्वल दर्जाची साधने मिळवण्यासाठी परदेशातही जायचे त्यांनी ठरविले होते. मृत्यूपर्यंत या ग्रंथाचा दुसरा व तिसरा विभाग त्यांनी लिहून पूर्ण केला होता. परंतु तो प्रसिद्ध होण्यापूर्वीच ते मृत्यूवश झाले. ह्या ग्रंथाचा दुसरा भाग इ. स. १९६३ मध्ये प्रसिद्ध झाला.

**'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण'**

केतक-यांनी अनेक कादंब-या लिहिल्या हे सर्वश्रुतच आहे. त्या कादंब-यांवर अनुकूलपेक्षा प्रतिकूलच जास्ती लिहिले गेले. परंतु त्याने विचलीत न होता साहित्य-व्यवहारांबाबत लोकांत पुरेशी अभिज्ञता नाही हे त्यांचे मत होऊन ग्रंथपरीक्षणात्मक तत्त्वांच्या बाबतीत आपणच काहीतरी सांगितले पाहिजे हे ठरवून साहित्य-तत्त्वांबद्दल स्वतंत्र पुस्तक लिहावे असे त्यांनी निश्चित केले. त्यासाठी त्यांनी 'विविधज्ञान विस्तारा'च्या पहिल्या वर्षापासून आलेली बहुतेक परीक्षणे वाचून टाकली. शे-दीडशे परीक्षणे गोळा केली. परंतु स्वतःच्या कादंब-यांतील तत्त्वांच्या समर्थनार्थ त्यांनी हा जो अभ्यास सुरू केला होता, तो उद्देश बाजूला पडून काहीशा वेगळ्या विषयावरच एक ग्रंथ निर्माण झाला.

या परीक्षणांच्या अभ्यासानंतर जुन्या काळात काव्यात अभिज्ञता कशी होती व सामान्यतः वाङ्मयाविषयी अभिरूची कशी होती याचा शोध त्यांनी घेतला. जुन्या मराठी ग्रंथकारांमध्ये जी काव्यचिकित्सात्मक बुद्धी दिसून येते तिचा आढावा घेऊन नंतर अर्वाचीन काव्यपरीक्षण मांडावे या विचारातून 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' अथवा मराठी वाङ्मयाभिरूचीच्या इतिहासातील एक प्रकरण : 'ब्रिटीश सत्तेपूर्वीचा काल' हा ग्रंथ जन्म पावला. या ग्रंथात दुसरा महत्त्वाचा विषय मांडला आहे. तो म्हणजे 'रामदासांनी दासबोधात मांडलेली काव्यदृष्टी' हा होय. संतमंडळीत काही काव्यविषयक तत्त्वे नवीन होती तथापी ती त्यांस साहित्यशास्त्राच्या भाषेत सांगता आली नाहीत. ती जर त्यांना सांगता आली असती, तर साहित्यशास्त्रात एक नवीन संप्रदाय उत्पन्न होऊन कुंठित झालेल्या साहित्यशास्त्रास चालना मिळाली असती. दहाव्या प्रकरणात रामदासांनी साहित्यशास्त्रीय विचार अगदी स्वतंत्र केला आणि तो संस्कृत ग्रंथकारांच्या पुढे नेला असे त्यांनी प्रतिपादन केले आहे.

केतकर एखाद्या विषयाचा अभ्यास करायला लागल्यानंतर त्यांच्या अभ्यासाला नवीन शोधांचे व कल्पनांचे भव्य भांडारे दिसू लागत. परंतु या अभ्यासाला व्यवस्थित मूर्त स्वरूप देण्याकरिता आवश्यक असलेला प्रचंड वेळ त्यांच्यापाशी नसे. एक विषय संपल्यानंतर दुस-या विषयावर

उडी घेण्याची त्यांना घाई असे. त्यामुळे त्यांचे ग्रंथ काहीसे अपूर्ण व विस्कळीत स्वरूपात झाले आणि ते विद्वानांच्या टीकेस पात्र झाले. परंतु ग्रंथात विस्तृत तपशील अथवा विवेचन नसले तरी विचारांच्या ठिणग्या असत. त्यांच्या या अशा प्रकारच्या ठिणग्या उचलून अनेकांनी आपले ग्रंथ पुढील काळात सजविले आहेत. या ग्रंथाबाबतही असाच प्रकार झाला आहे. डॉ. मा. गो. देशमुख यांचे 'मराठीचे साहित्यशास्त्र', प्रा. भा. श्री. परांजपे यांचे 'रामदासांचे साहित्यशास्त्र' इत्यादी ग्रंथ म्हणजे केतकरांनी आपल्या ग्रंथात सूत्ररूपाने व्यक्त केलेल्या कल्पनांचे विस्तृतीकरणच होय.

**'इंडियन इकॉनॉमिक्स'**

केतकरांनी प्राचीन भारतीय वाङ्मय व मराठी साहित्य या व्यतिरिक्त इतरही बरेच विषयांवर लिखाण केले आहे. ते सर्वच ग्रंथ महत्त्वाचे असले तरी 'इंडियन इकॉनॉमिक्स' आणि 'व्हिक्टोरीयस इंडिया' हे त्यांचे दोन ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. कलकत्त्यास प्राध्यापक असताना इ. स. १९१४ मध्ये 'इंडियन इकॉनॉमिक्स' हा ग्रंथ लिहिला. या पुस्तकात केतकरांनी हिंदुस्थानच्या आर्थिक प्रगतीविषयी आपले विचार प्रगट केले. हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करताना जातिभेद, पारलौकिकाचे आकर्षण, अल्पसंख्य जमाती यांसारख्या बिगर आर्थिक गोष्टींचा विचार करून ह्या आर्थिकेत्तर गोष्टींचा हिंदुस्थानच्या आर्थिक प्रगतीवर फार मोठ्या प्रमाणात होतो, हे मोठ्या मार्मिक आणि सूक्ष्म युक्तिवादांनी सिद्ध केले, त्यामुळे हिंदुस्थानचा आर्थिक विकास साधावयाचा असेल, तर आर्थिकेत्तर गोष्टींमध्ये सुधारणा घडवून आणाव्या लागतील हा निष्कर्ष त्यांनी काढला आणि त्या कशा कराव्या हेही त्यांनी सांगितले. केतकरांचे हे लिखाण अतिशय उद्‌बोधक असून आर्थिक प्रगतीवर परिणाम करणा-या आर्थिकेत्तर गोष्टींवर या लिखाणाने नवा आणि स्पष्ट प्रकाश पडला. केतकरांच्या इतर पुस्तकांप्रमाणेच ह्याही पुस्तकातील काही वादग्रस्त उता-याने त्यांना कलकत्ता विद्यापीठाची नोकरी सोडावी लागली.

**'व्हिक्टोरियस इंडिया'**

हे पुस्तक आयुष्याच्या शेवटी शेवटी त्यांनी लिहिले आणि ते प्रेसकडे पाठविण्याच्या बेतात असतानाच केतकरांना मृत्यु आला. त्यांच्या मृत्युनंतर इ. स. १९३७ मध्ये तो प्रसिद्ध झाला. या पुस्तकाला शिलवतीबाईंचे दीड पानांचे प्रास्ताविक आढळते. ह्या पुस्तकाबद्दल जेवढे लिहावे तेवढे थोडेच होईल असे वाटते, इतकी विचित्र व विक्षिप्त मते ह्या पुस्तकांत केतकरांनी व्यक्त केली आहेत. यात इंग्रजांनी भारताला कधी जिंकलेच नाही असे प्रतिपादन त्यांनी केले आहे. भारताला स्वातंत्र्य मिळाले आहे अशी कल्पना करून स्वतंत्र भारताची घटना, पार्लमेंटचे हक्क, महात्मा गांधीबद्दलची टोकाला गेलेली त्यांची विरुद्ध मते वगैरेबद्दलचे चित्रण या पुस्तकात त्यांनी केले आहे. ह्या पुस्तकाची खूप टवाळी व हसे झाले. 'विक्षिप्तपणाचा कळस', 'त्यांच्या बुद्धीला लागलेली आहोटी' यांसारखे शब्द त्यांच्या या पुस्तकाबद्दल वापरण्यात आले. असे जरी असले, तरी एक वेगळी बाजू मनात गृहीत धरून हे पुस्तक वाचले, तर ते निश्चितच मनोरंजक आहे, असे म्हणावेसे वाटते. त्याचप्रमाणे उपेक्षा, उपहास, आणि कुचेष्टा जरी त्या पुस्तकाच्या निमित्ताने केतकरांच्या पदरात पडल्या तरी त्याचा केतकरांवर काहीही परिणाम न होता त्यांनी आपले राजकारण चिकाटीने सुरू ठेवले होते हेही नमूद करणे अवश्य आहे.

**इतर संशोधनात्मक ग्रंथ**

कलकत्त्याला असताना (१९१४) 'हिंदू लॉ-ए हिस्टॉरिकल स्टडी' या नावाचे एक पुस्तक लिहिले. त्यामध्ये 'कायदा' आणि स्मृतिकारांनी उपदेशिलेला 'धर्म' यांचे तौलनिक विवेचन करून हिंदू कायद्याच्या इतिहासाची रूपरेषा सिद्ध करून ठेवली. 'संकीर्ण लेख' (१९१५) या पुस्तकात त्यांनी गौतमबुद्धाबद्दल काही वादग्रस्त विधाने केली आहेत. ह्या विधानांवर आक्षेप घेऊन प्रा. धर्मानंद कोसंबी व त्यांच्यात बराच वाद झाला होता. 'निःशस्त्रांचे राजकारण' (१९२६) हे पुस्तक हिंदुस्थानचे स्वातंत्र्य व इंग्रज या विषयाला वाहिले आहे. 'माझे बारा वर्षांचे काम उर्फ ज्ञानकोश मंडळाचा इतिहास' (१९२७) या पुस्तकात मराठी ज्ञानकोशाची कल्पना प्रथम डॉ. केतकरांच्या मनात आल्यापासून ती पार पाडेपर्यंतचा सगळा वृत्तांत दिला आहे. 'भारतीय समाजशास्त्र' हा ग्रंथ (१९३६) जातीव्यवस्था, ब्राह्मणांचे कर्तव्य, हिंदूंच्या

सुसंघटनेची आवश्यकता त्यांचा भविष्यकाळ इत्यादी विषयांवर आहे.

'ज्ञानकोशा'चे कार्य पूर्ण झाल्यानंतर केतकरांनी 'विद्यासेवक' ह्या नावचे एक मासिक काढले होते. ते बरेच वर्षे चालविले. या मासिकातून ते नियमितपणे लिखाण करीत. त्यांच्या समग्र वाङ्मयाची सूची 'मीच हे सांगितलं पाहिजे' ह्या शिलवतीबाई केतकरांनी लिहिलेल्या पुस्तकाच्या शेवटी आपल्याला पहावयास मिळते.

**केतकरांच्या कादंब-या**

गंभीर विषयांवर लिहिणारे लेखक अशी जरी केतकरांची ख्याती असली, तरी ललित विषयात त्यांनी केलेली कामगिरीही दुर्लक्षून चालणार नाही. कथा, नाटक, कविता या अनेक क्षेत्रात त्यांनी विहार केला असला तरी कांदबरीक्षेत्रात त्यांचे योगदान एवढे भरघोस आहे की, मराठी कादंबरी लेखनाचा इतिहास लिहिताना त्यांचे नाव ठळकपणे घ्यावेच लागते. इतिहासकारांनी तसे ते घेतलेही आहे. एवढेच नव्हे तर मराठीतील थोर लेखकांनी त्यांच्या कादंबरी लेखनाची दखल घेऊन त्यावर विस्तृत लिखाण केले आहे.

त्यांच्या समग्र कादंब-यांचा आढावा व मूल्यमापन येथे करणे शक्य नाही व त्याची आवश्यकताही नाही. त्यांच्या कादंब-यावरून कळून येणारे त्याचे स्वरूप व केतकरांचा त्यामागील हेतू एवढेच येथे जाणून घ्यायचे आहे. केतक-यांनी एकूण सात कादंब-या लिहिल्या. 'गोंडवनातील प्रियंवदा' (१९२६), 'परागंदा' (१९२६), 'आशावादी' (१९२७), 'ब्राह्मणकन्या' (१९३०), 'गावसासू' (१९३०), 'विचक्षणा' (१९३७) आणि 'भटक्या' १९३८. कादंब-यांचा किंवा सर्वच ललित वाङ्मयाचा हेतू हा सौंदर्यदर्शन असतो. पण केतकरांनी इथेच आपले वेगळेपण दाखविले आहे. त्यांनी सौंदर्यदर्शन हा हेतू पार धुडकावून 'ज्ञान', 'विचार' वगैरे बुद्धीच्या क्षेत्रात ज्या गोष्टी असतात त्या नजरेसमोर ठेवून 'बोध' करण्याच्या प्रमुख उद्देशाने आपल्या कादबं-या लिहिल्या आहेत. आपल्या गंभीर प्रकृतीच्या ग्रंथातून व्यक्त केलेले समाजशास्त्रीय विचारदर्शन सामान्य लोकांपर्यंत पोचले पाहिजे या प्रचाराकरिता त्यांनी कादंबरी या वाचकप्रिय कला प्रकाराचा आश्रय घेतला. त्यामुळे साहजिकच त्यांच्या कादंब-यांची घडण ओबडधोबड आणि एकंदर कृती पांडित्यपूर्ण झालेली आहे. भाषा रूक्ष आणि रचना शिथील आहे.

अशा परिस्थितीत साहजिकच 'तंत्र' यादृष्टीने त्यांच्या कादंब-यांवर टीका झाली असल्यास नवल नाही. ग. त्र्यं. माडखोलकर हे या टीकाकारांत अग्रणी आहेत. त्याचप्रमाणे त्यांच्या कादंब-यांची तरफदारी करणारेही लेखक आहेत. प्रा. श्री. ना. बनहट्टी लिहितात —

"केतकरांनी निरनिराळ्या सामाजिक प्रश्नांचा, रूढींचा व कल्पनांचाही आपल्या कादंब-यांत पात्रद्वारा उहापोह केला असल्यामुळे त्यांच्या कादंब-या अतीव उद्‌बोधक व विचारप्रवर्तक झाल्या आहेत व त्या मराठी वाङ्मयात चिरकाल टिकून राहतील यात संशय नाही. ('विहंगम', एप्रिल १९३७) तर प्रसिद्ध विचारवंत व कादंबरीकार वा. म. जोशी म्हणतात — त्यांच्या कादंब-यांमध्ये दोष आहेत, पण त्यांनी मराठी कादंबरीवाङ्मयात चांगली भर घालून कादंबरीविषयक टीकाकाराला आपले जुने कलात्मक विचार तपासून पाहण्यास लाविले आहे यात शंका नाही......'कले'चे नाव एकसारखे घेऊन विचारशून्य उखाणे घेत बसणा-यांपेक्षा वरील दोष करून विचार-प्रवर्तन व सद्‌भावनापोषण करणा-या केतकरांमध्ये उच्चतरदृष्ट्या कलात्मकता अधिक आहे, असे मला वाटते." ('विचारसौंदर्य' पृ. ६२)

सारांश, वाङ्मयाकडे पाहाण्याची केतकरांची दृष्टी समाजशास्त्रज्ञाची होती, कलावंताची नव्हे, ही गोष्ट डोक्यात पक्की ठेऊन त्यांच्या कादंब-या वाचल्या की, त्यातील सौंदर्य जाणवेल, असे म्हणावयास हरकत नाही.

**केतकरांचे काही व्यक्तित्त्वविशेष**

केतकरांचे कार्य साहित्यप्रेमींनी आदर्श म्हणून आपल्या डोळ्यांसमोर ठेवावे असे होते. अत्यंत महत्त्वाकांक्षामूलक साहस त्यांनी आपल्या अंगी बाणवून विराट स्वरूपात ते प्रगट केले. मनुष्याच्या एका हयातीत सुचणार नाही एवढ्या विचारांची कोंदाकोंदी त्यांच्या डोक्यात झाली होती आणि ते सुसंगतपणे व्यक्त करण्यास आवश्यक असलेला वेळ त्यांच्याजवळ नसल्याने त्यांच्या वाङ्मयात विस्कळीपणा व शैलीत खडबडीपणा आढळतो.










सर्वसामान्य व्यक्तीच्या आवाक्यात असलेल्या कितीतरी पट अधिक त्यांच्या प्रतिभेची झेप व बुद्धीचा आवाका होता. अवघ्या बावन्न-त्रेपन्न वर्षांच्या आयुष्यात निरनिराळ्या विषयांवर निर्माण झालेले त्यांचे अवाढव्य वाङ्मय पाहिले की, तो एक चमत्कारच वाटतो. त्यांच्या बुद्धीचा विचार करताना अनेकांना इतिहासाचार्य राजवाड्यांव्यतिरिक्त दुसरी व्यक्ती आढळतच नाही. यावरून त्यांची बुद्धी व कार्य या दृष्टीने महाराष्ट्रात हाताच्या बोटावर मोजण्याइतपतही व्यक्ती नव्हत्या हेच सिद्ध होते.

स्वतःच्या बौद्धिक सामर्थ्याविषयी विलक्षण अहंता आणि आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणी होता. अमेरिकेत असताना होतकरू विद्यार्थी म्हणून त्यांना मान-सन्मान मिळे. परंतु त्याचे त्यांना काही वाटत नसे. हे मान-सन्मान देणा-यांची पदवी तरी कोणती? त्याला किंमत तरी किती द्यायची? असे त्यांना वाटे. शालेय वयात ते स्वतःला वामनपंडिताहून श्रेष्ठ कवी व तारुण्यात स्वतःला महापंडित समजत. वस्तुतः स्वतः केतकरांखेरीज कोणीच केतकरांना कवी समजत नसे माडखोलकरांसारख्या विख्यात कादंबरीकाराजवळ ते मनमोकळ्या गर्वाने म्हणत की, "तुम्हा सर्वांपेक्षा मी चांगला कादंबरीकार आहे." लोक आपल्या वाङ्मयाबद्दल काय म्हणतात, याची ते अजिबात फिकीर करीत नसत. आपली बुद्धिमत्ता समजण्याइतकी ही बुद्धी लोकांच्या ठिकाणी नाही असे त्यांना वाटे. ते म्हणत, 'मला असे वाटते की, मी जे काय लिहिले आहे त्याची उत्तम प्रकारे जाणीव होण्याइतका ज्ञानविकास भोवतालच्या जनतेत नाही, त्यामुळे लोकांच्या स्तुतीनिंदेचीही मला फारशी फिकीर वाटत नाही.'

केतकरांना महाराष्ट्र एक अजस्त्र कार्य करणारा दीर्घोद्योगी ग्रंथकार म्हणून ज्याप्रमाणे ओळखतो त्याचबरोबर एक विक्षिप्त आणि विचित्र विद्वानही म्हणून त्यांची ख्याती होती. विक्षिप्त मनुष्य हा सामान्यातीलच परंतु सर्वसामान्यांपेक्षा वेगळा व्यवहार करणारा असतो. सामान्य मनुष्य जे लोकव्यवहार करायला अथवा लिहायला संकोचतात ते लोकव्यवहार व शिष्टसंकेत धुडकावून लावून सहजगत्या याचे व्यवहार बिनधोकपणे चालत असतात आणि असे करताना आपण काही विचित्र आणि वेगळे करतो आहोत याची जाणीवही त्याला नसते. केतकर अशा प्रकारचे होते. त्यांच्या विक्षिप्तपणाची अनेक उदाहरणे त्यांच्या चरित्रात आहेत. पण स्थलसंकोचास्तव येथे एकही उदाहरण देता येत नाही. मात्र एवढे नमूद करणे आवश्य आहे की, त्यांच्या विक्षिप्तपणापासून कधी दुस-याला त्रास झाला नाही.

**अखेरचे दिवस**

केतकरांचे अखेरचे आयुष्य उत्साहवर्धक म्हणावे असे गेले नाही. ज्ञानकोशाचे काम संपल्यानंतर दारिद्र्याने त्यांचा पिच्छा पुरविला तो शेवटपर्यंत सोडला नाही. दारिद्र्यामुळे अत्यंत हलाखीचे आणि लाजिरवाणे जीवन त्यांना घालवावे लागले. १९३०-३१ च्या सुमारास ते एकदा बडोद्याला गेले होते, तेव्हा न्यायमूर्ती गोपाळ कृष्ण दांडेकर यांनी त्यांना विचारले. "डॉक्टर कसे काय चालले आहे?" त्यावर त्यांनी आपल्या विजारीला पडलेल्या छिद्रात हातातली पेन्सिल घातली व छिद्र मोठे करीत म्हटले, " सध्या हे असे चालले आहे." अखेरच्या काळातील त्यांच्या आर्थिक स्थितीचे खरोखरच ते प्रतीकात्मक करुण चित्र होते. त्यांना खायला प्यायला भरपूर हवे असे, पण या काळात पोटालाही चिमटा घेण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला होता. डॉ. वि. भि. कोलते 'डॉ. केतकर आणि मी' या लेखात लिहितात "......डॉ. केतकर एका आरामखुर्चीत बसले. त्यांच्या पायात बूट होते. ते त्यांनी काढले आणि पाय लांबविले, त्या वेळी मला जे दिसले, त्याच्या स्मृतीने अजूनही मला दुःख होते! केतकरांनी आपल्या दोन्ही पायात मोजे घातले होते. पण या दोन्ही मोज्यांच्या तळपायाचा भाग फाटून छिन्नविच्छिन्न होऊन गेलेला होता. असे फाटके मोजे त्यांनी घातलेले पाहून मला अत्यंत दुःख झाले. त्या वेळी ते आर्थिक दृष्टीने अत्यंत हलाखीचे जीवन जगत होते, त्यांचाच हा एक आविष्कार होता....." शिलवतीबाई केतकरांनी आपल्या आठवणीत लिहिले आहे, ".....मला आठवतं, अनेकदा खर्चायलाही पैसा नसे. तेव्हा डॉक्टर अगदी काकुळतीला येऊन मला म्हणत, "तूच ज्ञानकोश कचेरीत जाऊन खर्चासाठी थोडे पैसे मागून आण!" सेवकांचे पगार देता आलेले नाहीत. अशा परिस्थितीत मी ऑफिसकडे कोणत्या तोंडाने पैसे मागायला जाऊ?

तू जाऊन थोडे पैसे आणलेस, तर त्यावर कसं तरी भागवून घेऊ!" पण ज्ञानकोश कचेरीत जाऊन पैसे मागणं मलाही अतिशय अवघड वाटे, म्हणून मी जात नसे.

केतकरांवर आलेल्या दारिद्र्याच्या अशा प्रसंगांमुळे कोण्या सहृदय माणसाचे अंतःकरण कळवळणार नाही! पण अशाही परिस्थितीत आपल्या लेखनाकडे त्यांनी दुर्लक्ष होऊ न देता प्रचंड उद्योग करण्याची जिद्द मनात बाळगली होती आणि आपल्या लेखन प्रकल्पांचा भव्य पसारा त्यांनी मांडून ठेवला होता. गुजराती ज्ञानकोशा-सारखे अनेक पूर्ण ग्रंथ प्रकाशात आणि 'प्राचीन महाराष्ट्रा'च्या उर्वरित भागांसारखे अनेक अपूर्ण ग्रंथ शेवटास न्यायचे होते. 'मनुस्मृती' प्रमाणे 'श्रीधरस्मृती' लिहिण्याची त्यांची अत्यंत साहसी महत्त्वाकांक्षा होती. याप्रमाणे ज्ञानोपासनेत ते इतके गढले होते की, मृत्यूने ज्यावेळी त्यांना गाठले त्या वेळी मृत्यू हा कोणत्याही क्षणी जीवन संपवू शकतो ह्या सत्याचाच विसर पडावा!

मृत्यू आपल्या फार जवळ आला आहे असे त्यांना कधीही वाटले नव्हते. ज्ञानकोश संपल्यानंतर निदान पंचवीस-तीस वर्षे जगण्याची त्यांना उमेद होती. 'मी किमान ऐंशी वर्षे जगणार आहे' असे उद्‌गार दोनचारदा त्यांनी शिलवतीबाईजवळ काढले होते. परंतु मधुमेही केतकरांना फाटल्या जोड्यातून खिळा रूतण्याचे निमित्त झाले. त्यांना गोरगरिबांच्या पुण्यातल्या ससून हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आले. हॉस्पिटलचा जिना चढताना "....या हॉस्पिटलमधून मी परत घरी तरी येईन की, नाही कोण जाणे?" असे निराशेचे उद्‌गार त्यांनी शिलवतीबाईजवळ काढले. पैशाच्या अभावी या हॉस्पिटलमध्ये योग्य उपचार न मिळून दि. १० एप्रिल १९३७ ला रात्री दहाच्या सुमारास केतकरांचे निधन झाले. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या देहाचे दहन न करता दफन करण्यात आले. ज्या बुटाच्या छिद्रातून त्यांना खिळा रूतला होता तो बूटदेखील त्यांनी केवळ पैशाच्या काटकसरीमुळे व्यवस्थित दुरुस्त केला नव्हता. अशा रितीने केवळ दारिद्र्यामुळे महाराष्ट्रातील या महापंडिताचा शोकनीय अंत झाला.

**समारोप**

ज्यांची महाराष्ट्राला नितांत आवश्यकता अशा एका महापंडिताचे 'दारिद्र्य' त्या केवळ एकाच कारणामुळे निधन झाले ही कल्पनाच किती करुण आणि शोकात्मक आहे! महाराष्ट्र त्यामुळे त्यांच्या हातून निर्माण होणा-या अपार मौलिक ज्ञानसंभाराला मुकला. अनेक कामे आणि अनेक संकल्प त्यांच्या बरोबर शांत झाले. समाजकल्याणार्थ ज्या व्यक्तींनी जगणे अत्यंत आवश्यक असते त्यांनाच इहलोक लवकर सोडून जावे लागते हा नियतीचा समाजाला असलेला शाप केतकरांच्या बाबतीत खरा ठरला. केतकरांचा अशा रितीने झालेला शोकनीय अंत पाहून मन सुन्न होऊन जाते आणि लेखाचा समारोप कोणत्या वाक्यांनी करावा हेही सुचेनासे होते.












# गांधी विचारांची सद्य:कालीन प्रस्तुतता

माधव चोले

महात्मा गांधी हे विचार आणि आचारात सुसंगतपणा असणारे व्यक्तिमत्त्व होते. गांधींनी सांस्कृतिक विभिन्नता असणा-या देशाला स्वातंत्र्य मिळवून देवून नवभारताची राष्ट्रबांधणीकरण्याचे मोठ्या प्रमाणात प्रयत्न केले आणि यशस्वीही झाले. गांधीना आपल्या नवभारतात व्यक्तीचा सर्वांगीण विकास करावयाचा असल्यास व्यक्तींना विवेकबुद्धीची स्वायत्तता असणारा शासनमुक्त समाज, व्यक्ती-व्यक्तीत भेदविरहित सामाजिक, आर्थिक समन्वय, सलोखा असणारा समाज, श्रमाला महत्त्व असणारा आणि भौतिक चैनविलासापासून दूर असणारा समाज साध्य करणे हे गांधीजींचे साध्य तत्त्व होते. त्यासाठी सत्याग्रह, अहिंसात्मक मार्ग, विश्वस्तता, सर्वोदय याचा साधन म्हणून वापर करावा असे गांधींनी सांगितले आणि स्वतः व्यवहारातही आणले. गांधी साध्य-साधन तत्त्वाला महत्त्व देतात ते म्हणतात, भ्रष्ट साधनाची परिणीती भ्रष्ट साध्यात होते. साधने विशुद्ध असतील तर साध्याकडे अधिक वेगाने वाटचाल होईल. याचाच अर्थ उत्तम साध्याबरोबर साधने ही विशुद्ध असावी लागतात.

गांधी विचारांची प्रस्तुतता पाहण्यासाठी सध्याच्या प्रश्नांची चर्चा होणे आवश्यक आहे. औद्योगिकीकरणांमुळे, शहरीकरणांमुळे पर्यावरण धोक्यात येवून त्याचा परिणाम निसर्ग आणि मानवी आरोग्यावर होत आहे. त्यासाठी पर्यावरणपूरक, संवर्धनासाठी गांधी विचारांची आवश्यकता आहे. दुसरा मुद्दा म्हणजे मानव अधिकाधिक सत्ता, संपत्ती, भौतिक भोगविलासी झाल्यामुळे तसेच मनुष्याची वरचेवर विवेकशीलता कमी होत आहे. जात, धर्माची चिकित्साही दुरावली आहे. प्रतिनिधिक लोकशाहीत आलेल्या राजकीय भानाला पक्के अधिष्ठान नसल्याने मानव हा अधिकाधिक जात, जमातवादी होत आहे. त्यामुळे देशांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर दंगली, हिंसा वाढत चाललेल्या आहेत. त्यामुळे आज गांधींच्या शांततावादी अहिंसेची आवश्यकता आहे. तिसरा मुद्दा म्हणजे राज्यकर्ता वर्ग लोक सम्मुख व गरीब सम्मुख झाला पाहिजे होता. पण तसे न होता राज्यकर्ता वर्ग, उत्पादन केंद्रीत, सत्ताकेंद्रीत, भांडवलशाहीच्या हातातील बाहुले बनला आहे. त्यासाठी मानवकेंद्रीत सत्तेसाठी राजकीय विकेंद्रीकरण होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे राज्य संस्थेच्या अन्यायकारी धोरणाविरुद्ध पूर्ण सत्याग्रही मार्गाने विरोध करण्याची गरज आहे. शिवाय हिंदू-मुस्लीम ऐक्यासाठी, सर्वधर्म समभावासाठी, स्त्रियांचा राजकारणात सहभाग वाढविण्यासाठी गांधी विचारांची आज नितांत गरज आहे. गांधी विचारांने हे प्रश्न कसे हाताळता येतील ते पाहू.

**उत्पादन पद्धत-छोट्या प्रमाणाचा प्रश्न-भांडवलशाहीची समीक्षा-पर्यायी आर्थिक नीती :-**

गांधींनी भांडवलशाही केंद्रीत अर्थव्यवस्थेला विरोध करून (समीक्षा) खेड्यांची स्वयंपूर्णता, स्वायत्तता व स्वावलंबनावर भर दिला. त्यात शेती लहान प्रमाणात करण्यावर व त्याला पूरक म्हणून ग्रामोद्योगावर भर दिला. आज या विचारांची निकड आहे.

सध्या भांडवली धार्जिणी, सत्ता, संपत्ती, शहरीकेंद्रीत धोरण, प्रतिष्ठान निर्माण झालेली आहेत. उदा., स्मार्ट इंडिया, डिजिटल इंडिया या धोरणामुळे शहरे चकचकीत होतात. लोकांना शहरांचे आकर्षण वाढले आहे. शहरांकडे लोकांचा ओघ वाढला आहे. पण या शहरीकरणामुळे वाढत्या औद्योगिकीकरणामुळे मानव ख-या गरजा, खरे सुख, समाधान, शांती यापासून दुरावला आहे. सर्वजण नुसते भांडवली, सत्ता, संपत्ती, भोगविलासी स्पर्धेत धावत आहेत. एकमेकांबद्दल प्रेम, दया राहिलेली नाही. प्रत्येकांच्या ध्येयामागे, कृतिमागे अर्थ-राजकारणच दिसून येते. मात्र याचा अर्थ असा नाही की, सरकारांनी ग्रामीण अर्थव्यवस्थेबद्दल धोरणे घेतलीच नाहीत. घेतली पण जेवढी गुंतवणूक करायला पाहिजे जी प्रतिष्ठा, ग्रामीण

अनुक्रमणिका

अर्थव्यवस्थेला द्यायला पाहिजे ती मिळाली नाही. त्यामुळे शहरे चकचकीत, खेडी ओस पडल्यासारखी झालेली आहेत. खेडी आणि संबंधित अर्थव्यवस्थेला केंद्रभुत मानून शासनाने धोरणे आणि प्रतिष्ठा मिळवून दिली तर ख-या अर्थाने अनेक प्रश्न मिटणार आहेत. पण सरकारचे म्हणणे खेड्यात जास्त गुंतवणूक केली तर, तिजोरीत भर पडणार नाही, परकीय भांडवल आणि उद्योगांमुळे तिजोरीत भर पडते, अनेकांना रोजगार मिळतो हे खरे असले तरी भांडवलधार्जिणी व्यवस्था अनेक पेच निर्माण करते आणि त्यावर सरकारला बराच खर्च करावा लागतो. भांडवली अर्थव्यवस्था मानवात जीवघेणी स्पर्धा निर्माण करते, शहरात परस्पर मत्सर, द्वेष, हिंसा, भांडणे, तंटे निर्माण होतात. त्यातुन आत्महत्या, बलात्कार, खुन, दंगली, रक्तपात निर्माण होतो आणि हे प्रमाण वाढतच चालले आहे. मुख्यतः या अर्थव्यवस्थेमुळे समाजातील रचनेत आर्थिक विषमतेची दरी भयावह स्वरूपात वाढत आहे. व्यक्तीचे स्वतंत्र अस्तित्व आणि स्वायत्तता नष्ट होत आहे. शहरीकरण हे अनेक समस्यांचे नेटवर्क बनले आहे. पर्यावरणाचा जीवघेणा प्रश्न निर्माण झालेला आहे. ग्रामीण अर्थव्यवस्था मोडकळीस आलेली आहे.

याचा अर्थ गांधीजींचा यांत्रिकीकरण आणि भांडवलशाहीला विरोध होता असे नाही. या दोन गोष्टींमुळे अनेक प्रश्न निर्माण होऊ शकत होते. म्हणून विज्ञान आणि तंत्रज्ञान मानवतेला पूरक असावे. भांडवलशाहीच्या अतिरेकी स्वरूपाऐवजी, छोटे प्रमाण ठेवावे असे त्यांचे मत होते. त्यामुळे गांधी पर्यायी आर्थिक नीती सांगतांना शेती व ग्रामोद्योगांना प्राधान्य देवून जास्तीत जास्त गुंतवणूक, शेती व संबंधित उद्योगांवर करावी, मोठ्या उद्योगाऐवजी शेतीशी पूरक छोट्या उद्योधंद्यावर भर द्यावा, शेतक-यांनी आपला शेती हा मुख्य व्यवसाय करण्याबरोबरच पूरक व्यवसायही करावेत, त्यामुळे अनेक प्रश्न मिटण्यास मदत होईल, अशा सूचना केल्या होत्या. जीवघेणी स्पर्धा असणार नाही. तसेच मोठ-मोठी धरणे न बांधता, छोटी-छोटी धरणे, बंधारे बांधावीत जेणेकरून शेती व्यवसायाला पाण्याचा साठा मुबलक होईल. पण याचा अर्थ सरकार प्रयत्न करीत नाही असा नाही. करते पण फारच तोकडा आहे. शिवाय उद्योग शहरातच स्थापन करण्याऐवजी त्याचे विकेंद्रीकरण करावे. जेथे जो कच्चा माल आहे तेथे उद्योग स्थापन करावेत. असे झाले, तर मानव केंद्रीत व्यवस्था, पर्यावरणपुरक व्यवस्था निर्माण होईल.

**सत्याग्रही मार्गाने राज्यसंस्थेला विरोध :-**

गांधींनी परकीय राजवटींच्या काळात जुलूम आणि अन्यायाविरुद्ध लढण्याचे, अहिंसात्मक साधन म्हणून सत्याग्रहाचा वापर केला. सत्याग्रहाचा अर्थ असा की, "सत्याची प्रस्थापना करण्यासाठी व्यक्तीने, समुहाने केलेली अहिंसात्मक कृती होय." या अर्थाच्या आशयाला धक्का न लावता सध्या उपलब्ध अर्थराजकीय चौकटीतील व्यवहारिक राजकारण कसे घडवता येईल. या प्रश्नांचा विचार सत्याग्रही राजकारणांची प्रस्तुतता शोधतांना करावा लागेल. अहिंसात्मक मार्गानेच सत्याग्रही कृती केली पाहिजे या मार्गानेच आपण अंतिम सत्यापर्यंत जावून पोचतो. गांधींच्या मतानुसार सत्याग्रही व्यक्तींच्या अंगी आत्मसंयमन, ब्रह्मचर्य, शाकाहार, कृत्रिम बनावट सभ्यतेपासून दोन हात दूर, अपरिहार्यता जोपासणे, कर्मयोग आचरणे इत्यादी गुण असावे लागतात. सत्याग्रहाचा वापर वैयक्तिक तसेच सामुहिक पातळीवर करता येतो आणि तसा करावा पण सत्याग्रह हा सामाजिक हितासाठीच करावा. वैयक्तिक लाभासाठी करू नये, अन्याय करण्यासाठी करू नये, संपूर्ण अहिंसेचाच मार्ग अनुसरला पाहिजे. सर्वांनी सामुहिक शिस्तही पाळली पाहिजे. गांधीनी सत्याग्रही मार्गात, आत्मशुद्धी, असहकार करणे, सविनय कायदेभंग करणे, हरताळ, बहिष्कार, हिजरत, उपोषण इत्यादिंचा वापर करावा असे सांगितले.

आपण भांडवलशाही समाजाच्या प्रस्थापित अर्थराजकीय चौकटीत सत्याग्रहांचे राजकारण घडवू पाहत आहोत. या सामाजिक व्यवस्थेत आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, संपत्ती व संधीच्या विषम विभाजनातून निरनिराळे हितसंबंधी गट आकाराला येत असतात. भांडवल समाज विषमतेवर आधारलेला असल्याने समाजातील प्रभुत्वशाली हितसंबंधी गट इतरांचे शोषण करीत असतात. या शोषणातून इतर तळाच्या वर्गातील माणसांचे भौतिक जीवन, अस्तित्व धोक्यात येते या प्रक्रियेत राज्यसंस्था तटस्थ न राहता विशिष्ट हितसंबंधी गटांच्या बाजूने सतत

हस्तक्षेप करत असते. तिला लाभलेल्या दंडशक्तीच्या आधारे राज्यसंस्था समाजाच्या केंद्रस्थानी असते.

अशा व्यवस्थेत सत्याग्रही व्यक्तीने समूहाने भांडवलशाही चौकटीत राज्यसंस्थेची भूमिका ओळखून शोषितांच्या बाजूने हस्तक्षेप करावा. हे करत असतांना अहिंसात्मक व नैतिक आधारावर सत्याग्रह करण्यात यावा अशी आजची गांधींच्या सत्याग्रहाची प्रस्तुतता भांडवली अर्थराजकीय चौकटीत आवश्यक आहे. उदा., नर्मदा बचाव आंदोलन-मेधा पाटकर, अण्णा हजारेंचे जनलोकपालांचे आंदोलन, नेल्सन मंडेलांचे रंगभेदाचे आंदोलन, नरेंद्र दाभोलकरांचे आंदोलन, अलीकडचे मुस्लीम आणि मराठा समाजाचे आरक्षणाचे आंदोलन हे याच चौकटीत चालू आहेत.

**शांततावाद - अहिंसा :-**

सर्वच धर्मांनी अहिंसा एक महत्त्वाचे मूल्य मानले आहे. परंतु, महात्मा गांधींनी या मूल्याला सामाजिक व राजकीय परिमाण दिले. व्यक्तिगत जीवनाप्रमाणेच सामाजिक व राजकीय जीवनात सत्यशोधनाचा, सत्य प्रस्थापित करण्याचा एकमेव मार्ग म्हणून त्यांनी अहिंसेचा पुरस्कार केला. गांधींनी कोणत्याही व्यक्तीस शारीरिक किंवा मानसिक इजा न पोचवणे म्हणजे नकारात्मक अहिंसा तर प्रतिपक्षावर विरोधकावर किंवा शत्रूवर प्रेम करणे म्हणजे भावात्मक अहिंसा असे दोन प्रकार सांगितले. त्यांची अहिंसेची व्यापक संकल्पना होती. दुस-याचे वाईट चिंतने, शत्रुत्वाची भावना बाळगणे, यामुळे अहिंसेच्या तत्त्वाला बाधा निर्माण होते. असे त्यांचे म्हणणे होते. अहिंसक होण्यासाठी आत्मशक्ती, सत्तेची आकांक्षा नको, अहंकार व औद्धत्यहा नको, विनम्रता आणि धारिष्ट्याची आवश्यकता असते.

गांधी अहिंसक मार्गाचा वापर अन्यायी शासनाविरुद्ध, देशांतर्गत दंग्याधोप्याच्या व दंगलीच्या प्रसंगी, परकीय आक्रमणाविरुद्ध आणि स्वतःच्या कुटुंबात, संस्थेत वा संघटनेत करणे शक्य आहे, असे सांगतात. ते त्यांनी प्रत्यक्षात वापरात आणून दाखविले. गांधी हिंसेला नकार, युद्धाला नकार देवून अहिंसात्मक मार्गाने जागतिक शांतता प्रस्थापित करण्याचे सांगतात. गांधीच्या विचारांच्या आधारावर १९६०, १९७० च्या काळात जागतिक राजकारणात विशेषतः युरोपात आणि इतरत्र देशात अहिंसात्मक मार्गाची शांततामय चळवळ सुरू झालेली दिसते. आंतरराष्ट्रीय स्तरावर, शस्त्र-अस्त्र स्पर्धा वाढून हिंसात्मकता वाढलेली दिसते. तसेच देशांतर्गत स्तरावर सुद्धा, विशेषतः विकसनशील देशात, नागरी समाजात, जाती, धर्माच्या आधारावरील राजकारणातील दंगली, वंशवादाच्या दंगली, वरचेवर वाढतांना दिसतात. तसेच प्रदेशवाद, फुटीरतावाद, दहशतवाद या प्रकारच्या हिंसात्मक प्रवृत्ती वाढल्याने जिवीत हानीत वाढ झालेली दिसते, महानगरांमध्ये अर्थराजकारणामुळे खुन, हिंसाचार होतांना दिसतात. अशा हिंसात्मक धामधुमीत मानवाला शांततामय सुखी जीवन जगता येणार नाही. गांधींच्या विचारानुसार आजच्या परिस्थितीत हिंसाचार रोखायचा असल्यास शांततामय मार्ग, चर्चा, मन परिवर्तन, प्रबोधन करून देशांतर्गत नागरी समाजातील दोष दुर करता येतो. त्यासाठी तशा चळवळी, सरकारची इच्छाशक्ती आवश्यक असते. तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर हिंसाचार, युद्ध रोखायची असल्यास पंचशील तत्त्वे याचा वापर करून तसेच नाम (अलिप्ततावादी चळवळी) चा वापर करून हिंसाचार रोखता येतो.

**विकेंद्रीकरण, राजकीय-आर्थिक सत्तेचे :-**

गांधींच्या आदर्श राज्यांचा मूळ आधार खेडे राहील, प्रत्येक खेडे स्वावलंबी, स्वयंपूर्ण व स्वायत्त असेल. या खेड्यात राजकीय-आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण राहिले. उत्पादन केंद्रीत, सत्ताकेंद्रीत, राजकीय व्यवस्थेऐवजी मानवकेंद्रीत सत्तेसाठी-राजकीय सत्तेचे विकेंद्रीकरण आवश्यक आहे. गांधी विचारावर आधारीत संविधान अनुच्छेद ४० मध्ये राजकीय सत्तेच्या विकेंद्रीकरणासाठी पंचायत राज व्यवस्थेची तरतूद केलेली असून २ ऑक्टोबर १९५९ मध्ये भारतात पंचायत राजव्यवस्थेची स्थापनाही करण्यात आली. पण पंचायतराजला स्थानिक स्तरावर निर्णय घेण्याचा अधिकार मात्र दिलेला नाही. म्हणूनच आण्णा हजारे हे ग्रामसभा हीच संसद करण्यासाठी आंदोलन करत आहेत. सरकारने गांधी विचारावर आधारित ग्राम स्वराज्यासाठी अनेक कायदे केलेले आहेत.

गांधी राजकीय सत्तेच्या विकेंद्रीकरणाबरोबरच उपयुक्ततावादी आधुनिक अर्थशास्त्राला नकार देवून

भांडवलशाहीच्या केंद्रीय व्यवस्थेला विरोध करतात. गांधींच्या समाजव्यवस्थेत प्रमुख स्थान शेतीला व शेतीशी पूरक ठरणा-या लघु उद्योग, ग्रामोद्योगला आहे. गांधींच्या मते शेती ही सहकारी पद्धतीने व लहान प्रमाणात करून शेतीस पूरक ठरणा-या ग्रामोद्योगासारख्या हस्तव्यवसायांना प्राधान्य दिले पाहिजे. त्यामुळे खेडी आपल्या आवश्यक गरजांची पूर्ती करतील. खेड्यातील लोकांना नोकरीसाठी इतरत्र जावे लागणार नाही व बेकारी नष्ट होईल. आज शहरी भोगविलासी जीवनाचा लोकांना कंटाळा आलेला आहे. शहरी जीवनाने अनेक समस्यांना जन्म दिलेला आहे. अशा समस्यांपासून सुखी समृद्धीचे जीवन हे खरे खेड्यातच आहे म्हणून आता परत 'खेड्याकडे चला' असे म्हणावे लागले.

**पर्यावरणवाद :-**

गांधीजींच्या मते औद्योगिकरणांमुळे, शहरीकरणामुळे पर्यावरण धोक्यात आले आहे. त्यांचा परिणाम निसर्ग आणि मानवी आरोग्यावर मोठ्या प्रमाणावर झालेला आहे आणि त्यातून अनेक प्रकारांच्या समस्या निर्माण झाल्या आहेत. या औद्योगिकीकरणामुळे, शहरीकरणामुळे अनेक प्रकारचे रोग, सार्वजनिक असुरक्षिततेचा, स्वच्छतेचा प्रश्न, निसर्गातील वृक्षांच्या तोडीमुळे जमिनीची धूप, पावसाचे असमान वाटप झालेले दिसते त्यातून काही ठिकाणी कोरडा दुष्काळ पडतो. प्राणहानी व वित्तहानी होते. असा परिणाम औद्योगिकीकरणांमुळे पर्यावरणावर होतो. त्यासाठी गांधी म्हणतात, पर्यावरणाला पूरक संवर्धन करणारी ग्रामीण अर्थव्यवस्था स्वीकारावी. शेतीवर आधारित छोटे-छोटे लघू उद्योग गावपातळीवर निर्माण करावेत, त्यासाठी प्रोत्साहन देणा-या योजना राबवाव्यात जेणेकरून ग्रामीण अर्थव्यवस्था विकसित होईल. त्यामुळे अनेक प्रश्न सुटतील आर्थिक केंद्रीकरण होणार नाही, शोषण होणार नाही. पर्यावरणाला पूरक जीवन जगता येईल, पर्यावरण पूरक अशी छोटी-छोटी धरणे बांधावेत. त्यामुळे शेतीचा विकासही होईल पर्यावरणाचे संरक्षणही होईल. गांधींच्या या पर्यायी धोरणांमुळे पर्यावरण संरक्षण आणि शहरीकरणाचे दोष कमी होतील.

**हिंदू-मुस्लीम ऐक्य :-**

भारतात स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्यानंतरच्या काळात हिंदू-मुस्लीम जमातवादी राजकारणाची प्रवृत्ती परस्पर-विरोधी वाढीस लागलेली दिसते. त्याचा विपरीत परिणाम भारताच्या राष्ट्र बांधणीवर झालेला दिसतो. परस्पर विरोधी जमातवादी राजकारण वाढीस लागण्याचे कारण दोन्ही धर्माच्या लोकांत असलेली धर्मांधता आणि मुलतत्त्ववादी प्रवृत्ती होय. गांधींनी जमातवादी राजकारण नष्ट करण्यासाठी सर्वधर्म समभावाच्या विचारांची मांडणी केली. गांधींच्या या विचाराची आज निकड आहे. गांधींच्या मते दोन्ही धर्मातील जमातवादी प्रवृत्ती कमी करण्यासाठी सांस्कृतिक आदान-प्रदान करणे आणि एकमेकांची मने जिंकणे आवश्यक आहे. तरच ही प्रवृत्ती कमी होत जाईल. दुसरे म्हणजे गांधी आपल्या सर्वधर्म समभावात धर्मांतर्गत टीकेला वाव देतात. त्यांच्या मते दोन्ही धर्मातील अंतर्गत अन्याय, जुलमी, रूढी, परंपराविरुद्ध असून ते वाईट गोष्टींसाठी दोन्ही धर्मावर टीका करून दोन्ही धर्मात ऐक्य निर्माण करतात. आज या विचारानुसार दोन्ही धर्मातील कट्टरतावादी तत्त्वे, मुलतत्त्ववादी तत्त्वे नष्ट करावीत.

गांधी विचारांनुसार भारतीय पुरुषप्रधान व्यवस्थेत स्त्री आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक अधिकारहीन आहे. या तिच्या परावलंबामुळे ती सामाजिक व राजकीय जीवन जगण्यास असमर्थ ठरली आहे. आज स्त्रियांना विविध शैक्षणिक, प्रशासकीय, राजकीय सुविधा (राखीव जागा) दिल्या असल्या, तरी ती स्वायत्तपणे, स्वतःच राजकीय हक्क भोगू शकत नाही. गांधी स्त्रियांना स्वयंपूर्ण व ताकतवर बनविण्यासाठी तिला आर्थिकदृष्ट्या सबल बनविण्यासाठी तिला मालमत्ता हक्कात हिस्सेदार बनवावे, जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात पुरुषांबरोबरची स्थाने द्यावीत असे सुचवितात. ती आर्थिक बाबतीत सबल झाली की, राजकीयदृष्ट्याही सबल होईल.

**संदर्भ सूची :-**

1) राजेंद्र व्होरा, सुहास पळशीकर, राज्यशास्त्र कोश.
2) स. मा. गर्गे, समाजविज्ञान कोश.
3) Mahatma Gandhi and Gandhism, World focus-August-2011.






4) Prof. Ashok Bhattacharya, August-2011, Gandhi's Concept of Religion and Contemporary Scenario, World Focus, Page No. 463 to 468.

5) Dr. Sailaja Gallapalli, August-2011, Experiments with Gandhism : Contemporary perspectives, World Focus, Page No. 490, 91, 92.

6) Dr. Arunoday Bajpai, August - 2011, Global Challenges, Global Gandhi and Global India, World Focus, Page No. 500, 501, 502, 503.



अनुक्रमणिका

# शेती, शेतकरी आणि शासन -

लेखांक - १६

श्री. के. वनपाल

१९९८ साली नाशिकला 'मॅनेजिंग डायरेक्टर ट्रायबल डेव्हलमेंट कॉर्पोरेशन' येथे मॅनेजिंग डायरेक्टरच्या पदावर होतो. हा सरकारी नोकरीतला शेवटचा काळ होता. निवृत्त होण्याचे आनंददायी वेध लागले होते.

निवृत्तीच्या दिवशी कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांनी 'निरोप समारंभ' ठेवला होता. मला लागू होतील किंवा न होतील अश्या विशेषणांचा व स्तुतीचा पाऊस पाडीत, आपली काव्यप्रतिभा पणाला लावून वक्त्यांनी भाषणे केली. मीही उत्तराचे भाषण केले. आता सभा संपणार इतक्यात, श्रोत्यांत बसलेली, माझी मुलगी उभी राहिली व म्हणाली, "सत्काराचा समारंभ चांगलाच झाला. सभेचे संकेत बाजूला ठेवून मी बोलेन म्हणते. बोलू का? मी तुमच्या सरांची मुलगी!"

सगळ्यांनीच तिचे स्वागत केले. "अहो, अवश्य बोला!"

"माझ्या वडिलांचा नोकरीचा प्रवास आम्ही कुटुंबियांनीही सोसलाय. आनंद यादवांची 'झोंबी' म्हणून कादंबरी आहे. आपले आयुष्य म्हणजे एक 'झोंबी' होती, हे सांगण्यासाठी त्यांनी ती कादंबरी लिहिली. यादवांना व त्यांच्या कादंबरीलाही पुढे मोठी मान्यता मिळाली. माझ्या वडिलांची नोकरी ही देखील कष्टमय जीवनाशी घेतलेली एक झोंबीच होती. तुम्ही सगळे त्यांच्या विषयी मोठ्या प्रेमानं बोललात, म्हणून मलाही बोलावसं वाटतं आहे. त्यांना आलेल्या अनुभवांचा, त्यांनी सोसलेल्या संकटांचा एक आलेखच तुमच्यापुढे ठेवते."

मला माझ्या मुलीच्या वक्तृत्व-प्राविण्याची अजिबात कल्पना नव्हती. पण तिचं भाषण फारच चटकदार आणि आकर्षक झालं.

(१)

समारंभ संपल्यावर आम्ही कुटुंबीय व काही अधिकारी माझ्या कचेरीत गप्पा मारत बसलो होतो. तेव्हा मला जाणवले की, एक मनुष्य मधून मधून दारातून डोकावत आहे. तेव्हा मी त्याला म्हणालो, "अहो, आत या ना. परवानगीची जरूर नाही."

"ते खरंच आहे, काही बोलायचं होतं."

"या, आत या. बसा आणि सांगा काय ते."

"माझं येणं जाणं होतं या कार्यालयात. तुम्हालाही भेटलो आहे मी. पण आपली दाट ओळख नाही. मी डहाणूचा आणि गवताचा व्यापार करतो. डहाणूला आपली १७-१८ एकर जमीन आहे व एक छानसे फार्म हाऊस बांधलं आहे. आता मला आपला शब्द द्या. आता तुम्ही निवृत्त झालात. तेव्हा तुमच्याशी सलगी करून माझा काही फायदा होणारा नाही. त्यामुळे आता केवळ ओळख म्हणून एक मागणं मागतो आहे."

"पण काय हवंय ते तर सांगा."

"मला काहीच नकोय पण तुम्ही 'शब्द दिला' असं म्हटल्यावर मी पुढचं सांगेन."

"काही भानगडीचं नाही ना? मग 'शब्द दिला' म्हणून समजा."

"भानगडीचं काय असणार? अजिबात नाही. झालं असं, तुमची मुलगी तुमच्याविषयी इतकं छान बोलली, त्याचे मला कौतुक वाटलं. मी घरी कळवून टाकले की, साहेबांना आणि त्यांच्या कुटुंबाला घेऊन आपल्या फार्म हाऊसवर येतोय. आपल्या नातेवाईकांनाही घेऊन या. तुम्ही रात्रीच फार्मवर या. आम्ही उद्या सकाळी निघू. आता तुम्ही इतकंच करायचं की, आमच्याबरोबर उद्या सकाळी डहाणूला यायचं."

मला त्या व्यापा-याचे कौतुक वाटले. अहो, आमच्या सरकारी नोकरीतून रिटायर झाल्यावर आम्हाला कोण विचारतंय.

इथे एक छोटीशी गंमत सांगतो. आमच्याच एका तहसिलदाराने सांगितलेली. हुरड्याचे दिवस होते. एक





'रावसाहेब' हुरड्याच्या पार्टीला गेले होते. गावकरी तहसिलदाराच्या पुढं मागं घोटाळत होते. गावचे पाटील प्रत्येक कणीस हाताळून, कोवळं आहे ना, ते पाहून, स्वतः भाजून व चोळून हुरडा काढून तहसिलदारापुढं ठेवीत होते. कायम गरम हुरडाच रावसाहेबांना मिळाला पाहिजे याची खबरदारी घेत होते. रावसाहेबही मोठ्या चवीनं आणि आनंदानं हुरडा खात होते.

इतक्यात तहसिलदार कचेरीतून एक शिपाई टपाल घेऊन आला. रावसाहेबांनी टपाल हाती घेतलं. शिपाई रावसाहेबांच्या कानात कुजबुजला, "साहेब, कचेरीतले कारकून म्हणत होते, 'कमिशनर साहेबांच्या कडून टपाल आलंय. रावसाहेबांची बदली झाली असणार' 'बघतो, बघतो असे म्हणत रावसाहेबांनी लाख लावून बंद केलेला लखोटा उचलला' 'कमिशनर साहेबांचाच खलिता दिसतोय, असं स्वतःशीच म्हणाले. तहसिलदारांनी लखोटा निगुतीने उघडला. पत्र वाचताना त्यांच्या चेह-याचा नूर बदलला.

पाटील सगळं पाहात होते. शिपायानं केलेली कुजबूजही त्यांच्या कानी पुसटशी आलीच होती. त्यांनी सारं ताडलं आणि समोरचा चोळलेला गरम हुरडा रावसाहेबांपुढे न करता स्वतःच्याच तोंडात भरला!'

बदली झालेल्या तहसिलदाराची ही अवहेलना, तर निवृत्त अधिका-यांला कोण हो विचारणार!, आता ह्या व्यापा-याने मला फार्म हाऊसवर अगत्याने घेऊन जाण्याची तयारी दाखवावी, ही आचंबा वाटावा अशीच गोष्ट होती.

(१)

सगळं ठरलं. दुस-या दिवशी सकाळी ६ वाजताच व्यापारी गाडी घेऊन दाराशी हजर. आम्ही निघालो.

व्यापारी आदरानं बोलू लागला, "साहेब, सांगू का? तुमच्या आधीच्या एम्.डी. साहेबांनी आदिवासींना राहत मिळावी, या चांगल्या हेतूनं तुमच्या मंडळामार्फत अशी योजना आखली की, आदिवासींकडून गवत विकत घ्यायचं व मिलिटरीला विकायचं. (मिलिटरीच्या घोडदलाला ते लागत असे.) हेतू चांगला होता म्हणून एम्.डी. नी ही रिस्क घेतली. पण ते गवत उघड्यावर पडलं आणि अवकाळी पाऊस झाला. गवत वाया गेलं आणि एम्.डी. तर पैसे देऊन बसले होते! पत्रकारांनी सारे प्रकरण लावून धरले. पैसे खाल्ल्याचा आरोप लावून बदनामी सुरू केली. एक एन्क्वायरी बसली. काही कारण नसताना खूप सहन करावं लागलं त्यांना!"

"आपल्या कारकिर्दीत आदिवासींच्या गवताला चांगला भाव मिळावा यासाठी आम्ही व्यापारी तुमच्या ऑफिसला फे-या मारत होतो; पुनः तोच प्रयोग करावा म्हणून! पण तुम्ही वस्ताद निघालात. तुम्ही आमचा प्रस्ताव मानला नाहीत. उलट, आदिवासींनाही तुम्ही त्यातले धोके समजावलेत. तुमच्या कारकिर्दीत तो प्रकार झाला नाही. तुमचा कारभार म्हणजे दर लिलावाच्या वेळी आमच्या खेळ्यांवर मात! आम्हाला फार कौतुक वाटायचं तुमचं तेव्हा ठरवलं की, तुमचं सगळं कुटुंबच आमच्या लोकांना भेटवावं. आनंद झाला तुम्ही 'हो म्हणालात म्हणून.'

आता लक्षात आलं! हा प्राणी म्हणजे जीवनभाई शहा! खूप मोठी असामी. दर वर्षाला कोटी-दोन कोटीचा गवताचा व्यापार करणार! पण गडी लुच्चा दिसत नाही. त्याला काय माहीत की, 'या वर्षी गवताची खरेदी करू नये' असा आदेश मीच सरकारकडून आणवला होता! पण नंतर हेही वाटून गेलं की, गवत खरेदीचं प्रकरण जरा सबूरीनं आणि सावधानतेनं हाताळलं असतं. तर आदिवासींचा चांगला फायदा झाला असता. असो; व्हायचं ते होऊन गेलं! रुखरुख मात्र राहिली.

मात्र मी मंडळाला दुस-या मार्गाने सुमारे ५ कोटींचा फायदा करून दिला होता. आदिवासींची २६ शेती-उत्पादने आणि २६ वनोत्पादने यांचा लिलाव मी चांगला हाताळून हे पैसे मिळवले होते. व्यापारी मधासारखी वस्तू अगदी कमी दराने खरेदी करून औषध कंपन्याना जबरदस्त चढ्या दराने विकत. तीच बाब डिंकाची आणि रेशमी सुताची. पण व्यापा-यांच्या मनमानी खरेदीला चाप लावून मंडळाने आदिवासींना पैसे मिळवून दिले होते.

जीवनभाईंनी आमचं अगत्य, तर झकास केलं. नात्यातल्या सर्व व्यक्तिंशी ओळख करून दिली. हिरव्यागार हिरवळीवर सुबक झोपाळा लावला होता. त्यावर आम्हा तिघांना बसवून माझ्या कौतुकाच्या गोष्टी सांगितल्या. जेवण्या-खाण्यात पदार्थांची रेलचेल होती! हा दुसरा निरोप समारंभच!

(२)

पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा, खानदेश, विदर्भ इत्यादी भागात मी प्रशासकीय कामे केली होती. आता सेवाकाळाच्या अखेरीला हे आदिवासींच्या सेवेचं काम मिळालं. हे काम मला अनेक गोष्टी शिकवून गेलं.

या आदिवासी जमातीत मुलींची लग्ने १२-१३ व्या वर्षी होतात आणि १५ वर्षांच्या वयात तिला मूल होतं. ही मुलगी असेल, तर तिचं लग्न होऊन १५ व्या वर्षी तीही आई होते. म्हणजे वयाच्या तिशीतली आदिवासी तरुणी आजी होते! शिवाय एका स्त्रीला किती मूलं होत व त्यातली किती मरत यांचा हिशेबच नसे! आपल्या पांढरपेशात सगळं स्थिरस्थावर झाल्याखेरीज लग्न करायचं नाही म्हणून थांबल्याने मुलींची लग्नं २८-२९ वर्षांचं वय होईतो लांबतात. त्यांच्या तुलनेत या आदिवासी मुलींची ही दुरवस्थाच वाटते.

सगळ्या आदिवासी स्त्रियां लाकडे गोळा करणे व विकणे, मोहाची फुलं गोळा करणे, तेंदुपत्त्याच्या विड्या वळणे व विकणे, थोडी-बहुत शेती असेल तर ती करणे अशी अमाप श्रमाची कामे करत आणि त्याही पुरुषांबरोबर दारू पीत. सारखं वाटायचं की, कसं आणायचं याना शहरी राहाणीमानाच्या प्रवाहात? कोण देणार यांना आरोग्याचे धडे? कोण घेणार यांच्या कुपोषित बाळांची काळजी? कोण पटवून देणार त्यांना शिक्षणाचे महत्त्व?

असे खूप प्रश्न डोक्यात झिम्मा घालत राहायचे एकदा मी पत्नीला म्हटलेही की, आपली मुलं आता मार्गाला लागलीत घेऊ वानप्रस्थाश्रम आणि लागू आदिवासींच्या सेवेला! पण तसं व्हायचं नव्हतं. माझ्यासाठी निराळाच मार्ग नियतीनं आखला होता.

नाशिकच्या या कार्यकाळात आंध्र, पश्चिम बंगाल, ओडिशा, गुजरात या राज्यांना भेट देऊन आदिवासींच्या जीवनाला भिडणारी विकासाची कामे पाहण्याचा कार्यक्रम असे. गुजरातला गेल्यावर 'आनंद'मधल्या दुग्धप्रकल्पाला भेट दिली. त्यांनी दोन दिवस ठेऊन घेतले. खेड्यातली दूध खरेदी, आनंदमधील दुधावरची यांत्रिक प्रक्रिया व अखेरी सुरतमध्ये होणारी ७ लाख लिटर दुधाची विक्री हे सगळं तपशीलवार पाह्यलं. कूरियन साहेबाच्या दक्षतेचं मला कौतुक वाटलं होतं. महत्त्वाचं म्हणजे महाराष्ट्रात असा प्रकल्प उभा करायचा झाल्यास मदत करण्याचीही अमूल दूध प्रकल्पाची तयारी होती.

निवृत्त होऊन आलो. मुला-नातवंडात रमलो. नंतर रिकामं-रिकामं व गंजल्यासारखं वाटू लागलं. मग विचार केला की, खेड, जुन्नर या भागात दुष्काळ नसतो तरी काही भाग आदिवासींचा आहे. इथल्या आदिवासींची परिस्थिती बरी नाही. पुणे जिल्ह्याच्या दक्षिण भागात कात्रजचा दूधप्रकल्प आहे पण उत्तर भागात कोणताच उद्योग नाही. मन स्वस्थ बसू देईना.

हा सगळा भाग एकदा पाहून घ्यावा म्हणून मी रोज जेवणाचा डबा घेऊन शिवाजीनगर बस स्टॅण्डवरून त्या भागात एस्.टी.ने जायचे, असे मी ठरवले. सकाळीच एखाद्या खेड्यात जायचं. भेटतील त्या लोकांशी बोलायचं. त्यांच्या अपेक्षा व अडचणी यांचा आढावा घेणारं टिपण करून संध्याकाळी परतायचं, असं एक-दोन महिने केल. पूर्वी ९०-९३ साली मी पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेत (म. न. पा.) उपायुक्त होतो. तेथे काही धनाढ्य व कार्यकुशल नगरसेवक होते. त्यापूर्वी ८६-९० ही चार वर्षे कोल्हापुरात होतो. तेथील सहकारी तत्त्वावर चालणा-या उद्योगांचा मला परिचय होता. शेतकरी संघ, वारणेचा तात्यासाहेब को-यांचा प्रकल्प, रत्नाप्पा कुंभारांचा साखर-कारखाना व त्याचा विस्तार, हे सगळं मी पाहिलेलं होतं. माझी इच्छा अशी की, नारायणगाव-जुन्नर भागातल्या कोणा प्रतिष्ठिताने पुढाकार घेऊन काही प्रकल्प हाती घ्यावा. मी येईल ती भूमिका निभावेन. बरीच खटपट केली पण काही जमेना. यंत्रोद्योग व रिअल-इस्टेट या क्षेत्रात रमलेले नगर-सेवक अशा वाटेला लागतील, हे शक्य दिसेना.

(३)

योगायोग असा की, माझ्या गावीच (किरोली, ता. कोरेगाव, जिल्हा. सातारा) एक संधी चालून आली. गावातील देवस्थानाच्या ६ एकर जमिनीबाबत त्या जमिनीवरील दोन कुळात व गावक-यात झगडा लागला होता. मी निवृत्त झाल्याचं गावक-यांना कळलं होतं. एके दिवशी दैवस्थानाचे विश्वस्त व गावचे पुढारी पुण्याला माझ्याकडे आले. आगतं-स्वागत झाल्यावर त्यांनी मला आग्रह केला की, गावी येऊन या कामात मी लक्ष






घालावं.

ऑक्टोबर महिना होता आणि २ ऑक्टोबर ते १५ ऑक्टोबर असे चौदा दिवस स्वच्छता अभियान राबवण्याचं शासनानं ठरवलं होतं. तेव्हा दोन ऑक्टोबरला येतो असं मी कबूल केलं. सकाळची एस्.टी. पकडून स्वारगेट-सातारा-रहिमतपुर असा रस्ता पार करून रहिमतपुराला पोचलो. तिथून वडापच्या जीपने किरोलीला गेलो. एकाच जीपमधून १८-१९ मानसं नेण्याचं कसब ड्रायव्हरकडे होतं. पण छान प्रकरण होतं. जागा चांगली मिळावी म्हणून धडपड, भांडणं, शेलक्या शिव्या, ड्रायव्हरचं डाफरणं हे सगळं आनंदाने स्वीकारून किरोलीला पोचलो. नंतर १९९९ ते २००९ पर्यंत हे नियमानं करत गेलो.

गावाच्या वेशीवर तीन देवळं आहेत. या तीनही देवळात नमस्कार करून मग गावात व आपल्या घरी जायचं. मी येणार हे माहीत असल्यामुळे जोतिबाच्या देवळात माणसं जमली होती. मी गेल्यावर लाऊडस्पीकर-वरून पुकारा झाला आणि माणसांचा ओघ सुरू झाला. सगळ्या देवांना नमस्कार केला व देवळातच बैठक सुरू झाली.

थोड्या इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर पुढारी मंडळी मुख्य मुद्यावर आली. "साहेब, तुम्हाला कोणत्या नावानं ओळखायचं ते सांगा. एकदा वहिवाट पडली की, त्याच नावाने हाक मारली जाईल. लोकांशी बोलतानाही तेच नाव वापरू. सांगा."

"काहीही म्हणा हो. तुम्हीच ठरवा काय ते. पण साहेब वगैरे नको! मी तुमचा गाववाला आणि माझं नाव वनपाल हे तुम्हाला माहीतच आहे."

"तुम्हाला घरी दादा म्हणतात, हे माहीत आहे. वनपालदादा म्हणू या का रं?"

"हां, तसंच करू या", सगळ्यांनी उचलून धरलं.

शिक्षणशास्त्रातील वस्तुपाठात प्रस्तावना, उपाद्घात, साध्य, सिद्धता, उपसंहार अशा पाय-या असतात. या आमच्या पाठातली 'प्रस्तावना' ही पायरी पुरी झाली.

लोक म्हणाले, "आम्ही त्या कुळांना देवासमोर उभं करून सांगाटलं का, की वर्षाला एकरी दोन हजार रुपये देवस्थानाला म्हणून. अहो, त्यातून देवाच्या दिवा-वातीचा खर्च निघल, काही पैसा जत्रेच्या उपयोगाला येईल, असं बी समजावलं. पण कुळं ऐकेनात. मग आम्ही देवस्थानाचे ट्रस्ट बदलले आणि जमीन देवस्थानाला कुळांनी परत करावी, असा दावा लावलाय. देवस्थानची जमीन कूळकायद्याखाली येत नाही. आता तारखा पडताहेत. आम्हाला आता पुढचं मार्गदर्शन हवंय."

"ते तर मी पाहिनच. पण आणखी एक विचार घेऊन मी आलोय. बोलू का?"

"हे काय इचारनं झालं. तुमचं सगळं ऐकायासाठीच तर जमलो न्हवं? बोला, बोला काय बोलायचं ते."

"आज बापूजींचा जन्मदिवस आहे. स्वच्छता-मोहीम आज चालू होते. गावातल्या रस्त्यांची, गटारांची घाण काढायला नको का? लक्ष्मी आईच्या देवळापुढचं गटार पाहा. किती घाण साठलीय? मला वाटतं, हे काम हाती घ्यावं, पण तुमचा विचार पाहिला पाहिजे."

थोडा वेळ शांतता पसरली. 'हे काय वनपाल दादाचं' असा भाव ज्याच्या त्याच्या चेह-यावर दिसत होता. बरोबरच आहे. शेतीची कामं, घरची कामं त्यात हे नवं काम कुठलं जमायला?

पण तितक्यात हौशी शिवामास्तर उठले व म्हणाले, चांगल्या कामाला उशीर कशाला? आतापासूनच सुरुवात करू या की, तुमची बी वळक होईल नव्या पोरांशी. पण सुरुवात कशी करायची म्हणता?

"आता मी म्हटलं ना की, लक्ष्मी आईच्या देवळापुढचं गटार साफ करायचं म्हणून? आणून द्या मला फावडे आणि घमेले. ज्यानं त्यानं जमले तसं घमेलं, खोरं, खराटा, पहार आणावी. करू या सुरुवात" – मी

सभेत काही तरणी-ताटी बसली होती ती एकदम उठून म्हणाली, "चला रं, आणू या फावडी अन् घमेली" गेली व अर्ध्या तासात सामान घेऊन आली. सारं चित्रंच पालटलं. एका तरुणाच्या हातातलं फावडं घेतलं आणि त्या गटारात दोन घाव घातले. भानुदासबुवा नावाच्या म्हाता-या शेतक-यानं त्या तरुणाला सडकून शिव्या देऊन सुनावलं, "रांडलेका, लाज वाटती का दादाच्या हातात खोरं द्यायला? महारोग झाला व्हयं रं तुझ्या हातास्नी?" मग बुवांनी माझ्या हातचं फावडं घेतलं आणि म्हटलं, "गपगुमान, पिंपळाखाली बसायचं अन् आम्ही काय करतो ते बघायचं." मला पिंपळाखाली नेऊन बसवले.

घाण इतकी निघत होती, ही आता टाकयची कशी आणि कुठं याची मला काळजी लागली. पण काही लोकांनी बैलगाड्या आणल्या. गाड्या भरभरून घाण लेंडुरी नावाच्या ओढ्याकडं जाऊ लागली. दोन-तीन दिवस रोज सकाळी ८ ते दुपारी २ असा हा कार्यक्रम चालला.

एक दिवस ठरलं की, सा-या गावाचा वेढा काढून ही घाण कुणी-कुणी काढायची याची यादी करावी. म्हणून काही पुढारी मंडळी आणि मी, असे निघालो.

समोरनं एक चाळीशीची महिला आम्हाला आडवी झाली. मला म्हणाली, "दादा, मी सुतारनानांची लेक. हे समोरचं घर माझं. पण घरात नेऊन तुम्हाला चहा पाजावा असं ते न्हाई. घरात माझी १०-१२ कुत्री आहेत. ती लई घाण करतात. आता एक करा. ही धात्री ताटे घ्या अन् चावडीतल्या वश्या गुरवाला द्या. त्यो तुम्हाला चहा पाजील अन् मला तेवढंच बरं वाटलं."

विस्कटलेले केस, फाटकं पातळ, मळकी चोळी असा तिचा अवतार होता. चोळीतून तीनं ती नोट माझ्या हाती दिली आणि त्या दातृत्वानं मी हबकूनच गेलो. मी तिथंच बसून मुसमुसूं लागली. जवळची माणसंही गप्प झाली.

जरा वेळानं त्यांनी मला उठवलं. गावाचा वेढा काढून (काम करणा-या माणसांची यादी करून) आम्ही परतल्यावर चावडीत गेलो. वश्या गुरवाकडून चहा करून घेतला. प्यायला व स्वस्थ झालो. कुळांकडून जमिनी काढून घेण्याच्या खटपटीला ही नवीच दिशा मिळाली.



# ॲट्रॉसिटी ॲक्ट : अस्त्र की संरक्षण कवच?

विश्वांभर धर्मा गायकवाड

भारतासारख्या लोकशाहीप्रधान देशात संविधान व त्याद्वारे स्थापित प्रक्रियेने देशाचा कारभार चालतो. धर्म, जात व परंपरा, सामाजिक, सांस्कृतिक विविधता स्थित असलेल्या देशात कोणतीही योजना, धोरणे, कायदे हे पूर्णपणे यशस्वी न होता पुर्वग्रहदुषित होतात. म्हणून भारतात अनेक वाद-चर्चा घडत असतात. त्याचाच एक भाग म्हणून महाराष्ट्रात सद्यस्थितीत मराठा समुदायाचे जे मोठ्या संख्येने मूकमोर्चे निघत आहेत. त्या अनुषंगाने काही चर्चा किंवा मुद्दे चर्चेला आलेले आहेत. निमित्त एका कोपर्डी बलात्कार घटनेचे (अशा घटना निंदनीय व मानव जातीला न शोभणा-या असतात) पण त्या अगोदरपासूनच खदखदत असलेला जो असंतोष आहे तो मोर्चाच्या माध्यमातून प्रकट होत आहे. या मोर्चात प्रामुख्याने तीन मुद्दे चर्चेला आलेले आहेत –

i) कोपर्डी घटनेतील बलात्कार करणा-यांना फाशीची शिक्षा दिली गेली पाहिजे.

ii) मराठा समाजाला शैक्षणिक व नोक-यांत आरक्षण मिळाले पाहिजे.

iii) ॲट्रॉसिटी ॲक्ट रद्द किंवा सुधारित केला पाहिजे आणि इतर तत्सम मागण्या.

मोर्च्याची जी तिसरी मागणी आहे त्यावर इथे चर्चा करणार आहोत. ॲट्रॉसिटी ॲक्ट कायदा म्हणजेच अनु. जाती व जमाती अत्याचार प्रतिबंधक कायदा, सप्टे. ११, १९८९ ला भारतीय संसदेने संमत केला व ३१ मार्च १९९५ ला त्याची अमंलबजावणी सुरू झाली. तेव्हापासून आजपर्यंत या कायद्याची अमंलबजावणी व या कायद्याचे परिणाम व अनुषंगाने भारतीय राजकीय विश्वात यासंबंधी साधक-बाधक चर्चा घडून आलेल्या आहेत. यात प्रामुख्याने हा कायदा अनु. जाती व जमातीसाठी संरक्षक कवच म्हणून उभा आहे, तर अत्याचार करणा-यांच्या दृष्टीने हा कायदा अनु. जाती व जमातींकडून सवर्णांविरुद्ध अस्त्र म्हणून त्याचा गैरवापर होत आहे. भारतात सद्यस्थितीत सामाजिक नियंत्रण, कायदा-सुव्यवस्था व राष्ट्रीय सुरक्षा या दृष्टीने जे कायदे केंद्र व राज्य यांच्याकडून पारित करण्यात येतात किंवा आलेले आहेत. त्यांपैकी काही कायदे कुप्रसिद्ध म्हणून जनमानसात ओळखले जातात. त्यात प्रामुख्याने ॲट्रॉसिटी ॲक्ट १९८९, The protection of women from domestic violence act, 2005, Sexual Harassment of woman of workplace (Prevention & Prohibition ) act 2013, Dowry prohibition act 1961, New-anti rape law 2013, prevention detention apprehending breach offence, MCOCA 1999, Afspa act 1958 इत्यादी. या वरील सर्व कायद्याबद्दल जनमानसात प्रचंड भीती आणि दहशत निर्माण झालेली आहे. या कायद्याचा हेतू एकदम चांगला आहे पण या कायद्याचा गैरवापर झाल्यास मात्र निष्पाप व निर्दोष व्यक्तीचे, समूहाचे, गटाचे आयुष्य बरबाद होऊ शकते म्हणून या कायद्याबद्दल असेही म्हटले जाते की, हे कायदे 'Legal terrorism' म्हणूनही ओळखले जातात.

वरील कायद्यातील ॲट्रॉसिटी कायदा हा इतर कायद्यांच्या तुलनेत वेगळा आहे. कारण या कायद्याला सामाजिक आशय आहे. हा कायदा एका विशिष्ट समुदायाच्या विरोधात इतर समुदाय अशी विभागणी करतो.

(१)

या कायद्याची सामाजिक पार्श्वभूमी पाहत असताना, भारतात हिंदू व शीख धर्मांतर्गत जातिव्यवस्था किंवा वर्णव्यवस्था प्रचलित आहे. या व्यवस्थेप्रमाणे हिंदू समाजाचे श्रेष्ठ-कनिष्ठ या तत्त्वानुसार सामाजिक स्तरीकरण घडून आलेले आहे. या श्रेणीरचनेत चौथा

वर्ण हा शुद्र व अतिशुद्र म्हणून ओळखला जातो यास संविधानाच्या भाषेत अनु. जाती-जमाती संबोधले जाते. राज्यघटना अस्तित्वात येण्यापूर्वी भारतीय समाजात या वर्गावर अन्याय, अत्याचार, शोषण, पिळवणूक, मानअवहेलना, अपमान इ. त-हेने या जातीगटाना सवर्णाकडून अपमानित केले जात होते. ब्रिटिश आमदानीत काही कायदे नागरिकत्वाच्या आधारावर केले गेले ज्यामुळे या जातीगटांना नोक-यांत, प्रशासनात, सैन्यात कायद्यासमोर समानतेची वागणूक मिळू लागली. तरी पण प्रशासनात उच्चजातीय यांचा भरणा जास्त असल्यामुळे त्यांना तुच्छतेची वागणूक दिली जात होती. १९१९ च्या मॉंटेग्यू चेम्सफर्ड सुधारणा कायद्याचे मूल्यमापन करण्यासाठी १९२० ला एक समिती नेमली होती. या समितीने या काळात अस्पृशांवर मोठ्या प्रमाणात अत्याचार घडत असल्याची नोंद केलेली होती. पण त्यांची तक्रार घेतली जात नव्हती कारण पुराव्यासाठी कोणीही पुढे येत नव्हते. जेव्हा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी बॉम्बे विधिमंडळाचे सभासद असताना बहिष्कृत हितकारिणी सभेच्या माध्यमातून सायमन कमिशनला आपले निवेदन सादर केलेले होते. (२९ मे १९२८).

स्वातंत्र्योत्तर काळात दलितांवरील अत्याचाराच्या घटना कमी होण्याऐवजी वाढत गेल्या. या सर्व घटना केवळ जातीय मानसिकतेतून घडत होत्या. त्या संदर्भात असंख्य घटना व पुरावे आहेत. स्वातंत्र्यानंतर जेव्हा देशाची राज्यघटना निर्मितीची प्रक्रिया सुरू होती. तेव्हा मसुदा समितीचे अध्यक्ष व भारतातील बहिष्कृत समाजाचे नेते म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी राज्यघटनेत दलितांना सन्मानाने जगण्याची शाश्वती अनेक तरतुदींतून दिलेली आहे. दलितविरोधी कृत्यांना गुन्हा समजून त्यांच्या संरक्षणासाठी राज्यघटनेत कायदा करण्याच्या सूचना केल्या आहेत. ज्यामध्ये भारतीय राज्यघटनेच्या उद्देशपत्रिकेत स्वातंत्र्य, समता, न्याय, बंधुता यांची हमी देऊन राज्यघटनेचा उद्देश स्पष्ट केलेला आहे. तसेच घटना भाग-३ मध्ये कलम १४ ते १८ या दरम्यान समतेच्या हक्कांची तरतूद करण्यात आलेली आहे. ज्यानुसार क. १५ प्रमाणे सार्वजनिक ठिकाणी धर्म, जात, वंश, लिंग यावरून भेदभाव करता येणार नाही तसेच क. १७ मध्ये अस्पृश्यता पाळणे हा गुन्हा ठरविलेला आहे. अस्पृश्यता या संदर्भात बाबासाहेब घटना परिषदेत बोलत असताना असे म्हणाले की, "अस्पृश्यता ही नष्ट न करता अस्पृश्यता ही ज्याचा परिणाम आहे ती जातीयता नष्ट करण्याचे कलम करणे गरजेचे आहे." म्हणून घटना क. १७ ला मूर्त स्वरूप देण्यासाठी सन १९५५ ला पार्लमेंटने 'अस्पृश्यता बंदी' कायदा केला. मार्गदर्शक तत्त्वातील कलम ४६ मध्ये "अनु. जाती, जमाती व आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक यांचे शैक्षणिक व आर्थिक हितसंवर्धन विशेष काळजीपूर्वक करणे आणि सामाजिक अन्याय व सर्व प्रकारच्या शोषणापासून त्यांचे संरक्षण करणे हे शासनाचे कर्तव्य असेल." या व्यतिरिक्त घटनेच्या प्रकरण XVI (१६) मध्ये क. ३३० ते ३४२ पर्यंत मागासवर्गासाठी विशेष तरतुदी करण्यात आलेल्या आहेत. त्यात प्रतिनिधित्व, मागास आयोग इ. तरतुदींचा समावेश आहे. वरील सर्व संविधानिक तरतुदी पाहता दलित व आदिवासीवरील अत्याचार कमी व्हायला पाहिजे परंतु ते उत्तरोत्तर वाढत गेले याचे कारण संविधानाच्या माध्यमातून दलितांना जी विकासाची संधी प्राप्त झाली, दलितातातून काही सुशिक्षित वर्ग निर्माण झाला तो वर्ग पुढे होऊन अन्यायाचा जाब विचारायला लागला. अन्यायाच्या संरक्षणासाठी कायद्याचा व न्यायालयाचा आधार घ्यायला लागला. यामुळे उच्च व कनिष्ठ जातीतील संवाद वाढण्याऐवजी त्याची जागा वैमनस्याने घेतली. जातीय तणाव वाढून दलितांवर, आदिवासींवर अन्याय-अत्याचार वाढत गेले. या अत्याचाराला नियंत्रणात आणण्यासाठी १९५५ चा नागरी हक्क संरक्षण कायदा व भारतीय दंड संहितेतील (I.P.C. & Cr.P.C.) तरतुदी अपु-या ठरू लागल्या. तसेच NCRB ने आपल्या दर वर्षीच्या वार्षिक अहवालात दलित अत्याचारासंदर्भातल्या घटनेत वाढ होत असलेले अहवाल प्रकाशित केले. साहजिकच याचा दबाव सरकारवर वाढत गेला. त्यानुसार सन १९७६ ला नागरी हक्क संरक्षण कायदा (PCR) करण्यात आला. परंतु या सामाजिक कायद्यातील तांत्रिक व कायदेशीर पळवाटा पहाता हा कायदा कमी शिक्षेचा झाला. दलितांवरील अत्याचार वाढतच गेले. विशेषतः उत्तर भारतात उदा., उत्तर प्रदेश, बिहार, मध्यप्रदेश याचा परिणाम म्हणून

तत्कालीन पंतप्रधान राजीव गांधी यांनी १५ ऑगस्ट १९८७ ला स्वातंत्र्यदिनाचे भाषण देत असताना कडक कायदा करण्याची घोषणा केली. दरम्यान १९९० ला भारतीय अनु. जाती व जमाती आयोगानुसार एक राष्ट्रीय अभ्यास करण्यात आला. त्या पाहणीतून अत्याचारापाठी-मागच्या प्रमुख कारणाचा शोध घेण्यात आला. त्यात विशेषतः १) जमिनीचे वाद, २) कर्जबाजारीपणा, ३) मोलमजूरी न देणे, ४) जातीय पूर्वग्रह, ५) अस्पृश्यता पाळणे, ६) जातीनुसार राजकीय पक्षाचे गट, ७) पारंपरिक काम करण्यास नकार. उदा., अंत्यविधीचे सहकार्य, मृत जनावरांची विल्हेवाट, बाजा वाजवणे इ. पण यापेक्षा जातीय मानसिकता हे सर्वसाधारण कारण या अभ्यासातून पुढे आले. अस्पृश्यांनी त्यांच्या सामाजिक दर्जाप्रमाणे वागावे ही वर्ण जातीय मानसिकता कायम ठेवण्यासाठी दलितांवर अन्याय अत्याचार होऊ लागले. वरील वस्तुस्थिती लक्षात घेता. १९७६ चा नागरी हक्क संरक्षण कायदा व्यापक व सर्वसमावेशक करण्यासाठी १९८९ ला भारतीय संसदेने ११ सप्टें. १९८९ ला The Scheduled Castes & Tribes Act & (Prevention of Atrocities) मंजूर केला. या कायद्याची अंमलबजावणी ३१ मार्च १९९५ पासून जम्मू-काश्मीर वगळता संपूर्ण देशभर करण्यात आली. सन १९९५ पासून आजपर्यंत पुन्हा देशाच्या विविध भागात दलित अत्याचाराची तीव्रता वाढली म्हणून हा कायदा पुन्हा कडक करण्यासाठी या कायद्यात जानेवारी २०१६ मध्ये सुधारणा करून अत्याचाराचे प्रकार व व्याख्या नव्याने सामाविष्ट करून या कायद्याची व्याप्ती वाढविण्यात आलेली आहे.

(२)

या कायद्याबद्दल सवर्ण समाजात जे दहशतीचे वातावरण निर्माण झालेले आहे. याचे कारण या कायद्याची स्वतंत्र अंमलबजावणी यंत्रणा, अटकपूर्व जामीन नसणे, कडक शिक्षेची तरतूद यामुळे या कायद्यांतर्गत गुन्हा नोंद झाल्यास संबंधित गुन्हे करणा-यांचे आयुष्य उद्ध्वस्त होऊ शकते. या कायद्याची साधक-बाधक चर्चा करण्यापूर्वी या कायद्याची वैशिष्ट्ये पाहू या.

या कायद्याचे साधारणपणे तीन भाग पडतात.

अ) गुन्हेविषयक कायद्याची तरतूद, ब) पीडीतांना मदत, पुनर्वसन व नुकसान भरपाई, क) कायद्याची अंमलब-जावणी व त्यासाठीची यंत्रणा

१) IPC हा नागरी हक्क संरक्षण कायदा यात समाविष्ट नसलेले पण नवीन गुन्हे प्रकार याची नव्याने तरतूद.

२) गुन्ह्याचे कृत्य हे बिगर अनु. जाती व जमाती व्यक्तिकडून किंवा समुहाकडून घडणे.

३) या कायद्यात एकूण क. ३ (१) मध्ये २२ अत्याचाराची नोंद करण्यात आलेली आहे.

४) कडक शिक्षेची तरतूद करण्यात आलेली आहे.

५) गुन्हेगाराच्या संपत्तीच्या जप्तीत समावेश.

६) स्वतंत्र 'Trial Court' ची निर्मिती.

७) विशेष सरकारी वकिलाची नियुक्ती.

८) शस्त्रास्त्र बाळगण्याचा परवाना रद्द.

९) अनु. जाती व जमातीसाठी शस्त्रास्त्र देणे.

१०) अटकपूर्व जामीन अमान्य.

११) कायद्यात घटनादुरुस्तीचा अधिकार फक्त संसदेचा या व्यतिरिक्त.

१२) संपूर्ण क्षेत्र अत्याचार प्रतिबंधक घोषित करता येते.

१ जाने. २०१६ रोजी या कायद्यात आणखीन सुधारणा करण्यात आल्या. त्यात १) अन्यायग्रस्त, पिडीत व साक्षीदाराचे हक्क या नवीन चॅप्टरचा समावेश क. २ मध्ये केलेला आहे. त्याची माहिती फिर्यादींना देणे बंधनकारक आहे. २) अशा स्वरूपाच्या खटल्यांसाठी कालमर्यादा निश्चित करण्यात आलेली आहे. विशेषतः दोन महिन्यात केस संपविण्याचे बंधन आहे. ३) मत देण्याची बळजबरी करणेही आता या कायद्याच्या कक्षेत आलेले आहे. ४) जमीन बेकायदेशीररित्या बळकावणे. ५) सरकारी नोकरांनी त्यांची कर्तव्य करण्यास कसूर केल्यास विशेषतः SC व ST संबंधी.

या कायद्याच्या वरील तरतुदी व वैशिष्ट्ये पाहता हा कायदा सामाजिक दर्जावरून होत असलेल्या अत्याचार व मानहानी यांना प्रतिबंध करणारा आह, यात शंकाच नाही. पण या कायद्याचा गैरवापर झाल्यास निष्पाप व निर्दोष व्यक्तीचे आयुष्य बरबाद होते हे मात्र खरे. कारण घटना व अत्याचार खरा असेल, तर त्यास योग्य ती शिक्षा व्हावी याबद्दल दूमत असण्याचे कारणच नाही.

पण तक्रार/फिर्याद खोटी असेल व वैयक्तिक द्वेषातून, दुश्मनीतून झालेली असेल, तर ते चुकीचे आहे. तेव्हा यासाठीही काही तरतुदी कायद्यात असणे गरजेचे आहे. म्हणून तर आज महाराष्ट्रभर या कायद्याच्या गैरवापराबाबत मराठा समाजातून नकाराचा सूर येत आहे. त्यांच्या मोर्चाची ती एक प्रमुख मागणीच आहे. तेव्हा या कायद्यासंदर्भात जे आरोप केले जातात किंवा जे वास्तव आहे ते आपणास चर्चेतून पाहता येतील. तत्पूर्वी कायद्याची गरज व महत्त्व पाहू या.

१) दलित व आदिवासींवर होणारे जातीय हल्ले या कायद्यामुळे नियंत्रित झाले. २) हा कायदा दलित व आदिवासींना सुरक्षा कवच पुरविणारा आहे. ३) बहुसंख्यांकाच्या दादागिरीला यामुळे आळा बसेल. ४) भारतीय राज्यघटनेने प्रत्येकाला प्रतिष्ठेसह जीवन जगण्याच्या दिलेल्या अधिकाराची पुर्तता हा कायदा करतो. ५) हा कायदा दलितांना जातीय, धार्मिक परंपरेनुसार लादलेल्या अमानुष प्रथा, परंपरा, कार्य, विधी न करण्यासाठी संरक्षण देतो. ६) या कायद्याने दलित स्त्रियांना एक सुरक्षा कवच मिळाले. या कायद्याने दलितांना आत्मविश्वासपूर्ण प्रगती करण्यासाठी सुरक्षितता प्राप्त होते.

वरील काही प्रमुख लाभ या कायद्याने दलित व आदिवासींना स्वातंत्र्यानंतरच्या भागात या प्रभावी कायद्याने उपलब्ध करून झालेले आहेत म्हणून या कायद्याची प्रासंगिकता व उपलब्धता दलितांच्या व आदिवासींच्या दृष्टिकोनातून महत्त्वपूर्ण मानली जाते. त्यासाठी हा कायदा रद्द करूच नये यासाठी दलित व आदिवासी जनता कायद्याच्या अंमलबजावणीसाठी रस्त्यावर येणे साहजिक आहे. वरील कायद्याची गरज पाहता या कायद्याचा होत असलेला गैरवापर पाहणे गरजेचे आहे.

(३)

या कायद्याची गरज व उपयुक्तता पाहता हा कायदा रद्द न करता या कायद्याचा गैरवापर जर होत असेल, तर या कायद्यात सुधारणा होणे तितकेच गरजेचे किंबहुना महत्त्वाचे आहे. कारण आपल्या न्यायव्यवस्थेचे ब्रीदच 'आरोपी सुटले तरी चालतील पण एका निरपराध किंवा निर्दोष माणसाला शिक्षा होता कामा नये' या तत्त्वानुसार या कायद्यात सुधारणा सुचविण्यापूर्वी या कायद्याच्या गैरवापरावर प्रकाश टाकता येईल.

१) खोट्या तक्रारीचे प्रमाण बरेच आहे कारण या खटल्यांतर्गत गुन्हा सिद्ध (Convicted rate) होण्याचे प्रमाण ५ असून निर्दोष सुटण्याचे प्रमाण (Acquital rate) ९५ आहे. म्हणजेच चुकीच्या फिर्यादी जास्त आहेत हे मान्य करावे लागेल. २) या कायद्याखाली (खोटी अटक) अटक झालेल्या व्यक्तिला किंवा कुटुंबाला अनावश्यक निराशा व मानसिक त्रास होतो. ३) या कायद्याचा वापर दलित समाजातील श्रीमंत, कार्यकर्ते, गुंड लोक जास्त करतात. गरीब दलित, आदिवासी याचा वापर करत नाहीत. ४) या कायद्याचा वापर दलित व्यक्तिकडून सामाजिक हेतूपेक्षा वैयक्तिक हेतू (Personal intention) समोर ठेऊन केला जात आहे. ५) या कायद्याचा वापर काही दलित नेते पैशासाठी करत आहेत. ६) खोट्या गुन्ह्यामुळे ख-या गुन्ह्याकडे दुर्लक्ष होत आहे. ७) पोलीसांना गुन्हेगारांना विना वॉरंट व विनाचौकशी अटक करता येते. त्यामुळे गुन्हेगारांना अटकपूर्व जामीन मिळू शकत नाही. ८) या कायद्यानुसार केवळ पिडीतांनाच तक्रार करता येत नाही, तर पिडीताच्या वतीने कोणीही तक्रार करू शकतो. ९) या कायद्याची योग्य अंमलबजावणी करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर आहे ते पालीस अधिकारी संभ्रम व भीतीच्या वातावरणात याची अंमलबजावणी करतात. त्यामुळे ते विवेकाने, धाडसाने निर्णय घेऊ शकत नाहीत असे आढळून आलेले आहे. १०) गावगाड्यातील सवर्णा-सवर्णातील भांडणाचा /वैमनस्याचा बदला घेणे ११) साध्या-साध्या कारणावरून भांडणाला जातीय वळण देऊन या कायद्याचा वापर केला जात आहे. त्यामुळे विनाकारण निष्पाप लोक जेलमध्ये सडत आहेत. १२) दलितांकडून भांडणात स्त्रियांना पुढे करून ब्लॅकमेलिंगही केली जाते आहे. १३) गुन्हा नोंद झाल्यानंतर फिर्यादी नुकसान भरपाई मिळाल्यानंतर पुन्हा त्या गुन्ह्याचा शिक्षा होईपर्यंत पाठपुरावा करत नाही.

वरील प्रमुख गैरवापराशिवाय आणखीन गैरवापराची शक्यता गृहीत धरली असता हा कायदा रद्द किंवा सुधारणा करावी अशी मागणी मोठ्या प्रमाणात सवर्ण समाजातून

येत आहे हे साहजिक आहे. म्हणून या कायद्यात काही निवडक सुधारणा करण्यात येऊन खऱ्या गुन्हेगाराला शिक्षा व्हावी व खोट्या तक्रारीची नोंद घेता कामा नये यासाठी कायद्याच्या अंमलबजावणीच्या पातळीवर व न्यायालयीन चौकशी यासंदर्भात काही सुधारणा अपेक्षित आहेत.

गुन्ह्याचा तपास लवकरात लवकर लावावा. १) खोट्या गुन्ह्याची नोंद करू नये. २) योग्य तपास झाल्यानंतरच गुन्ह्याची नोंद व्हावी. ३) खोट्या तक्रारदारांना शिक्षा व्हावी. ४) या कायद्याचा वापर व्यक्तिगत हेतुऐवजी सामाजिक हेतुसाठी करण्यात यावा. ५) न्यायालयाने तक्रार नोंदणीपूर्व प्रकरणाची बारकाईने चौकशी करावी. ६) या कायद्याची अंमलबजावणी करणा-या पोलिस अधिका-यांना या कायद्याचे प्रशिक्षण देण्यात यावे. ७) गुन्हा खोटा ठरल्यास किंवा गुन्हेगार तपासाअंती निर्दोष ठरल्यास फिर्यादीला शिक्षा व्हावी. ८) गुन्हा नोंद होण्यापूर्वी तालुका प्रांताधिकारी, तहसिलदार, उपविभागीय पोलीस अधिकारी, समाजकल्याण अधिकारी इत्यादींकडून प्रकरणाची चौकशी करून त्यांच्या एकमताने गुन्हा नोंदणी संदर्भात निर्णय घ्यावा.

**समारोप**

ॲट्रॉसिटी कायद्यासंदर्भात आपण वर सविस्तर चर्चा केलेली आहेच. प्रश्न असा निर्माण होतो की, या कायद्यासंदर्भात जो विरोधी सूर पुढे येत आहे यावर उपाय काय असू शकतो. कोणताही सामाजिक कायदा हा चांगल्या व उदात्त हेतूने बनवला गेलेला असतो. त्याचा वापर कोण, कसे व कोणत्या हेतूसाठी केला जातो यावर त्या कायद्याचे यशापयश अवलंबून असते. काही कायदे समाजाला मान्य नसतात पण ते समाजाच्या फायद्याचे असतात. उदा., इंग्रजांनी सती बंदी संदर्भात केलेला कायदा याचे उत्तम उदाहरण आहे. त्याच पद्धतीने याही कायद्याचा उद्देश तोच आहे. घटनेने उद्घोषित केलेली मानवता, बंधुता व सामाजिक न्याय समाजात प्रस्थापित होऊन प्रत्येकाला प्रतिष्ठेसह जगता यावे हा या कायद्याचा उद्देश आहे. प्रस्तुत उद्देश पूर्ण होण्यासाठीच हा कायदा जाणिवपूर्वक संसदेने पारीत केलेला आहे. कायदा संपूर्ण भारतासाठी आहे. जर हा कायदा अप्रस्तुत असता, तर तो २०१६ ला आणखी कडक करण्याची गरजच काय होती? (तीही संसदेने)? तसेच हा कायदा असूनही NCRB च्या (२०१५) ताज्या अहवालानुसार देशात दलितांवर होणा-या अत्याचाराची नोंद देशातील वेगवेगळ्या पोलीस स्टेशनमध्ये संख्या ४५००३ आहे. यामध्ये उत्तर प्रदेश (१८.६%), राजस्थान (१५.६%), बिहार (१४.३%), आंध्रप्रदेश (९.८%) तर महाराष्ट्र (४%) महाराष्ट्राच्या संदर्भात पहायचे, तर १८१६ गुन्हे नोंद आहेत. त्यांपैकी १७९५ घटनामध्ये IPC बरोबरच ॲट्रॉसिटी कायद्याची कलमे आहेत. पैकी २९० घटनांत ॲट्रॉसिटी कायद्याची कलमे लावलेली आहेत. म्हणजेच हे प्रमाण अत्यल्प आहे.

यावरून असे लक्षात येते की, अत्याचारांची संख्या दिवसेंदिवस कमी होण्याऐवजी वाढतच आहे. आजही उत्तर व पश्चिम भारतात दलितांवर अत्याचार होतात, तर पूर्व भारतात आदिवासींवर हल्ले होतात. विशेष म्हणजे महाराष्ट्रातील आकडेवारी पाहता फारशी चिंताजनक नाही कारण गुन्ह्यांचे प्रमाण इतर राज्याच्या तुलनेत कमी आहे. म्हणून यासंदर्भात विरोधाचा आवाज उत्तर भारतात मोठ्या प्रमाणात निघणे अपेक्षित आहे. महाराष्ट्रात एवढा विरोध का? ॲट्रॉसिटी रद्दची मागणी खरीच योग्य मानावी का? ही राजकीय मागणी आहे अशी यात शंका येते.

खरे पाहाता, असे कायदे असायलाच पाहिजेत ज्यामुळे समाजातील विकृत मनोवृत्तीच्या लोकांना आळा बसेल. नसेल तर त्यांच्यावरील वचक कमी होईल आणि राजरोसपणे अत्याचार होतील. आज बलात्कारासंबंधी कडक कायद्याची तरतुद असूनही बलात्कार काही कमी झालेले का नाहीत, तर हे अपयश कायद्याचे नसून या समस्येचे उत्तर लोकांच्या मानसिकतेत आहे. प्रत्येकाने आपली पूर्वग्रहदुषित मानसिकता जी धर्म, जात, लिंग, वंश, श्रेष्ठ-कनिष्ठत्व इत्यादी संस्कारीत आहे ती बदलली पाहिजे. जागतिकीकरण, उदारीकरण, माहिती तंत्रज्ञान इत्यादीने माणसाच्या भौतिक अस्तित्वाला महत्त्व आलेले आहे. व्यक्तीचा सामाजिक दर्जा गौण होत असून त्याचा भौतिक दर्जा अधोरेखित होत आहे. तेव्हा समाजातील उच्च जातींनी जात मानसिकता संपवून वर्ग मानसिकता

जोपासली, तर जाती, धर्म, वंशाचे पोकळ अभिनिवेश गळून पडतील. त्यासाठी आपण भारताचे एक नागरिक एवढी ओळख निर्माण करावी. केवळ राजकीय दृष्टिकोनातून प्रश्न सोडवण्याचे ठरवले, तर तो प्रश्न न सुटता तो अनेक प्रश्न, उपप्रश्न निर्माण करत असतो, याची सर्वांनी विवेकाने दखल घ्यावी. हा कायदा अस्त्र न ठरता सुरक्षा कवच राहणे योग्य आहे. जर साधन मानल्यास त्याचा जसा उपयोग असतो तसा दुरुपयोगही होऊ शकतो.





अनुक्रमणिका

# संत साहित्यातील वैचारिकता

म. ई. तंगावार

संत साहित्य वैचारिक साहित्याची प्रयोगशाळा आहे. असे विधान केल्यास वावगे ठरणार नाही. या प्रयोगशाळेत संतांनी जे प्रयोग केले ते मानवी मुक्तीच्या कल्याणाचे होते. संत साहित्य बहुतांश प्रमाणात जीवनवादी साहित्य आहे. सर्वच जीवनवादी साहित्याच्या प्रवाहातून वैचारिकता असतेच असे नाही. मध्ययुगीन कालखंडातील बहुजन समाज हा अज्ञानी होता. विचारापासून हा समाज दूर असल्यामुळे सातत्याने त्याचे शोषण होत होते. तेव्हा अशा समाजाला विचाराच्या माध्यमातून संतांनी नवसंजीवनी प्राप्त करून देऊन त्यांच्यात नवचैतन्य निर्माण केले. स्त्री-पुरुष समानता, राष्ट्रभक्ती, राष्ट्रीय एकात्मता, स्वातंत्र्य, समता, बंधुता, सहिष्णुता व सर्वधर्मसमभाव ही मूल्ये संतांनी रूजविण्याचा प्रयत्न केला. अंधश्रद्धेवर प्रहार करून जातिनिर्मूलन करण्याचे काम भारतात सर्वप्रथम संतांनी केले. तेराव्या-चौदाव्या शतकात संत ज्ञानेश्वर व संत नामदेवांच्या काळात अठरा पगड जातीतील संतांचा समावेश वारकरी संप्रदायामध्ये झालेला आहे. संत साहित्यातील मानवी मूल्यांचा स्वीकारच आधुनिक विचारवंतांनी केलेला आहे, हे देखील तितकेच सत्य आहे.

जेव्हा समाज जातिभेदांनी विभागलेला होता. तेव्हा सामाजिक समतेची, एकतेची, विवेकतेची, बुद्धिप्रामाण्य व विज्ञानवादाची शिकवण संतांनी दिली. 'जे जे भेटे भूत। ते ते मानी भगवंत' या उक्तीप्रमाणे रात्रंदिवस युद्ध करून दूरितांचे तिमीर जावोत म्हणून विचार मांडून अवघाची संसार सुखाचा करण्याची दृढ प्रतिज्ञा संतांनी केली. 'जे का रंजले-गांजले.....' याचा प्रत्यय संत साहित्यात येतो. रंजल्या-गांजलेल्यांना पोटाशी धरून मातेची ममता संतांनी दिली. दया भाव व संस्कारमूल्य व त्यातून निर्माण झालेला प्रेरणादायी विचार हे संत साहित्याचे बलस्थान आहे.

महानुभाव, वारकरी, नाथ, वीरशैव, दत्त, समर्थ व सूफी संप्रदायातील संतांनी मातृभाषेचा पुरस्कार करून महाराष्ट्रात जे लेखन केले ते लेखन पुरोहितशाही, जातिव्यवस्था, वर्णव्यवस्था व कर्मकांडाला शह देणारे होते. एकंदरीत धर्मसुधारणेच्या आंदोलनाची सुरुवात संतांनीच केली. संताच्या दृष्टिकोनातून धर्माचा अर्थ उत्कृष्ट व आनंदी जीवन जगणे असा घेता येईल. संतांची भूमिका समाजाभिमुख होती. संतांनी आध्यात्मिक लोकशाही, तर निर्माण केलीच पण सामाजिक लोकशाही निर्माण करण्यास संतांना यश मिळाले नाही असे म्हटले जाते. तत्कालीन परिस्थिती लक्षात घेता हे काम तितके सोपे नव्हते. आज भारताला स्वातंत्र्य मिळून साठ वर्षे झाली. ख-या अर्थाने लोकशाही, समता इथे नांदते का? परिस्थिती अनुकूल नसतानाही संतांनी आध्यात्मिक लोकशाही निर्माण केली ते त्या काळात कितीतरी महत्त्वाचे होते. संत साहित्याचा सूक्ष्मपणे अभ्यास केल्यास लक्षात येईल की, यात सामाजिक लोकशाहीदेखील दडलेली आहे. ज्या काळात कुठलाच कायदा नव्हता, स्वतःची सत्ता नव्हती, समाज अज्ञानाने पोखरलेला होता, अंधश्रद्धेचे थैमान माजले होते, परकियांचे आक्रमण सातत्याने होत होते. याबरोबरच इतर भाषेचे वर्चस्व होते. अशा काळात संतांनी जी वैचारिक क्रांती केली ती सुवर्णअक्षरांनी नोंदवून ठेवण्यासारखी नाही का?

शुद्ध, पवित्र, निःस्वार्थ आचार व विचार कसा असावा? याचे दर्शन संत साहित्यातून होते. "संतांचा आदेश म्हणजे केवळ मंदिरातील व देवघरातील विचारांची पोथी व व्यवस्थेची केरसुणी नव्हे, तर तो एक उदात्त जीवनाचा पथप्रदर्शक आहे. जगाच्या संघर्षातून समाजास शांतीकडे नेणारे ते एक पाथेय आहे. समाजाच्या समृद्ध अवस्था निर्माण करणारी व त्याचबरोबर समाजाचा आदर्श, महान जीवनाचे दर्शन करून देणारी ती एक जीवनदर्शी निर्मळ विचारप्रणाली आहे."[१] संत साहित्य समाजाला शांततेकडे घेऊन जाणारे एक जीवनाचे पाथेय

अनुक्रमणिका

आहे. स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव ही मूल्ये पाश्चिमात्य नव्हती, तर ती संत साहित्यात व त्यापूर्वी होती. डॉ. यु. म. पठाण यांनी "समता आणि संत साहित्य" या लेखात "बंधुभाव नि समता ही दोन मूल्ये संत साहित्यातल्या मानवतावादी विचारांशी जोडलेली आहेत."[२] असे म्हटले आहे. "अद्वैताचा विचार हे एकत्वाचे सूत्र जर सर्वच प्राणिमात्रात असेल, तर मग त्यात श्रेष्ठ कनिष्ठत्वाचा प्रश्न यावाच का? अशा प्रकारचा एक विधायक विचार संत साहित्यात मांडला आहे."[३] संतांची अद्वैताची संकल्पना केवळ माणसापुरती मर्यादित नव्हती, तर ती व्यापक होती. ही अद्वैतता सर्व सजीवसृष्टींशी निगडित होती.

मानवतावादी भूमिका स्विकारल्यास विषमतावादाचा बुरूज ढासळतो. यावर संतांची गाढ श्रद्धा होती. संत ज्ञानेश्वरांनी पसायदान 'भूता परस्परे.....' असे म्हटले आहे. "प्राणिमात्राविषयी करुणाभाव हाच संतांचा स्थायी भाव......"[४] परंतु आधुनिक काळातील वैचारिक साहित्यात प्राणिमात्राविषयीचा दयाभाव व करुणाभाव दिसत नाही. यादृष्टीने संतांचा मोठेपणा व समतावादी दृष्टिकोन चिंतनीय आहे.

'एकमेकासाह्य करू। अवघे धरू सुपंथ' अशा त-हेचा बंधुभाव संतसाहित्यात आढळतो. आधुनिक विचारवंतांनी समतेबद्दल विचार मांडले नाहीत पण संत साहित्य हे समतेचं आणि ममतेचं साहित्य आहे. संतांनी केवळ विचार मांडला नाही, तर मानवी मूल्य रुजविण्यासाठी आपले आयुष्य झिजविले. गं. बा. सरदार लिहितात, "आपल्या लौकिक जीवनाचा ढाचा बदलणे जरी आपल्या हाती नसले, तरी परमार्थाच्या प्रांतात आपण सर्वस्वी स्वतंत्र आहोत. याबाबतीत आपले पूर्वसंचित आपल्या आड येऊ शकत नाही, आपला भक्तिभाव उत्कट, अनन्य व अविचल असेल तर कुणालाही आत्मसाक्षात्काराचे अत्युच्च शिखर गाठता येते, भक्तांच्या मेळाव्यात कुणी लहान नाही, कुणी मोठा नाही, कुणी हीन नाही, सर्व माणसे एकाच जगन्माऊलीची लेकरे आहेत, एकाच चित्तत्त्वाचे अंश आहेत, तेव्हा ईश्वरोपासकाने मनुष्यमात्राशी बंधुभावाने, आत्मौपम्यबुद्धीने वागले पाहिजे, अशी संतमंडळाची शिकवण होती. अशा त-हेने आपल्या भक्तिसंप्रदायात नामदेव तुकारामादि संतांनी स्वातंत्र्याचे व समतेचे वातावरण ब-याच मोठ्या प्रमाणात निर्माण केले होते."[५] 'संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रूती' या पुस्तकात गं. बां सरदारानी अशा प्रकारे समर्पक विचार मांडले आहेत. भक्ती सामाजिक परिवर्तनाचे प्रभावी माध्यम आहे. त्यामुळेच संतांनी भक्तिद्वारे समाजाचे प्रबोधन केले. भक्ती म्हणजे अध्यात्म असे नाही तर यात सामाजिकता दडलेली आहे.

माणसातील पशुत्त्व नष्ट करण्याचे महान कार्य संतांनी केले. आज सामाजिक लोकशाही निर्माण झाली, परंतु माणसातील पशुत्त्व मात्र कमी झाले नाही. लोकशाहीच्या लोकराज्यात कोणीही कोणाचे ऐकायला तयार नाही. अशी सामाजिक लोकशाही समाजाला काय देऊ शकेल? 'मी माणूस आहे' याची जाणीव संतांनी करून दिली. मध्ययुगीन काळात संत विचाराशी, संप्रदायाशी निगडित असलेली माणसं माणसाप्रमाणे वागू लागली होती. एकमेकांविषयी जिव्हाळा, एकोपा, आत्मीयता, आपुलकी, स्नेहभाव, तळमळ, सहिष्णुता याचे नाते राष्ट्रीय एकात्मतेशी आहे. भारत देश विविधतेने नटलेला आहे, हे खरे आहे. पण या देशातील विविधतेत स्वातंत्र्य, समता, बंधुता व मानवता नांदते का? भेदामुळे प्रेम, आपुलकी व आदर नाहीसा होतो व माणूस एकमेकापासून विलग होतो. तो समाजापासून दूर फेकला जातो. 'संत साहित्याचा सामाजिक अन्वयार्थ' या पुस्तकात डॉ. शरदचंद्र महाराज लिहितात की, "विविध धर्म, वंश, जाती, प्रांत, भाषा यांच्या भेदांची सर्व कुंपणे ओलांडून भारतासारख्या खंडप्राय देशात संतांनी राष्ट्रीय एकात्मतेचे यशस्वी असे प्रयत्न केले होते. सर्वच संतांनी परमार्थाच्या मार्गाने सामाजिक एकात्मता निर्माण करण्यात महत्त्वाचे योगदान दिले आहे. संतांनी 'यारे यारे लहान थोर' यासारखी केलेली आवाहने तसेच सर्व विश्वाच्या सुखासाठी केलेल्या प्रार्थना, उदा., पसायदान, याच वस्तुस्थितीची निदर्शक आहेत."[६] संत साहित्याच्या सामाजिकतेवर डॉ. शरदचंद्र महाराजांनी विस्ताराने आपल्या ग्रंथातून भाष्य केले आहे. जातीनिर्मूलन करणा-या संतांचे साहित्य राष्ट्रीय एकात्मतेचे द्योतक आहे. ज्ञानेश्वरांचे 'पसायदान' ही तर वैश्विक शांतीची व कल्याणाची मागणी आहे.

मराठवाडा बाजूला ठेवून महाराष्ट्रातील संत








साहित्यातील वैचारिकतेचा अभ्यास करता येणार नाही. संत ज्ञानेश्वर (आपेगाव पैठणजवळ), संत नामदेव (नरसी नामदेव), संत कवयित्री जनाबाई (गंगाखेड), संत गोरा कुंभार (तेर), संत मन्मथस्वामी कपीलधार (मांजरसुंबा), संत एकनाथ (पैठण), समर्थ रामदास (जांब), लक्ष्मण महाराज (आष्टी) याशिवाय विसोबा खेचर, नागदेवाचार्य, महदंबा जनार्दन स्वामी, जनी जनार्दन, शहामुनी, शेख महमद आदी संत मराठवाड्यातच होऊन गेले. संत साहित्य म्हटल्यानंतर विशेष करून वारकरी संप्रदाय आपल्या डोळ्यासमोर येतो. यात संत तुकाराम मराठवाड्यातील संत नसले, तरी वारकरी संप्रदायातील अतिशय लोकप्रिय संतकवी म्हणून तुकारामांचा विचार करावा लागतो. तुकारामासारख्या संतामुळेच वारकरी संप्रदाय मोठा झाला. नामदेव तुकारामादि संत जन्माला आले नसते तर विठ्ठल या नावाला वलय सुद्धा निर्माण झाले नसते. शिष्यामुळे गुरू मोठा होतो. याचा प्रत्यय वारकरी संप्रदायात येतो.

संत नामदेव व ज्ञानदेवांच्या काळात श्रम व कर्तव्य हीच परमेश्वराची पूजा समजून विविध जातीतील संतांनी अभंगाची रचना केली. संत नामदेवांना ८० वर्षांचे आयुष्य लाभले होते. अहर्निश भ्रमंती करून नामदेवांनी भागवतधर्म पंढरपूरपासून ते पंजाबपर्यंत नेला. विविध विषयावर अडीच हजार अभंगांची रचना केली. तेराव्या-चौदाव्या शतकात विविध जाती धर्मातील संतांनी लेखणी चालविली, त्याला संत नामदेव कारणीभूत आहेत. सर्वांना एकत्र बांधण्याच्या दृष्टीने संत नामदेवांचे कुशल संघटन वाखाणण्याजोगे आहे. संत नामदेव "अंधश्रद्धानिराकरणाचे अग्रदूत" या लेखात ललिता मिरजकर लिहितात, "संत नामदेवांनी समाजाला शुद्ध आचरणाची शिकवण दिली. उच्च-नीच भेद नष्ट करून समाजाला उच्च भावनिक आनंदाचा अपूर्व ठेवा दिला. ही त्यांची शिकवण म्हणजे कर्मकांडात गुंतलेल्या लोकांच्या डोळ्यांत शुद्धाचरणाचे घातलेले अंजनच होय. इसवी सनाच्या चौदाव्या शतकातील समाजाला एकात्मतेत बांधून ठेवणारे, त्यांच्या अंधश्रद्धा नष्ट करणारे आणि त्यांच्या वृत्तीचे उन्नयन करणारे संत नामदेवांचे कार्य मोलाचे होते."[७] संत नामदेव समतेचे सेनानी व कैवारी आहेत. संत चोखामेळा, सावता माळी, नरहरी सोनार, गोरा कुंभार इत्यादी संतांनी अभिव्यक्तीला तेराव्या-चौदाव्या शतकात वाट करून दिली. याचे श्रेय संत नामदेव व ज्ञानदेव सारख्या संतांकडे जाते.

संत साहित्य हे ख-या अर्थाने वैचारिकतेचे वैभव आहे. आधुनिक वैचारिक साहित्याच्या प्रेरणा काही प्रमाणात संत साहित्यात दडलेल्या आहेत. हे उघड आहे. "दलित साहित्य की वैचारिक पृष्ठभूमि" या लेखात डॉ. सूर्यनारायण रणसुभे यांनी आपली भूमिका निर्धारपूर्वक पार पाडली. "महाराष्ट्र में संत नामदेव ने भी वर्ण और जाति-व्यवस्था का तीखा विरोध किया। नामदेव ज्ञानेश्वर की इस वैचारिक परंपरा को सैद्धान्तिक रूप दिया तुकाराम ने। वारकरी से प्रेरणा के रूप में यह विचारधारा आगे विकसित हुई।"[८] संत ज्ञानेश्वर, नामदेव व तुकाराम यांची रचना विचाराची व समतेची बांधिलकी जपणारी आहे. या संतांनी एक समीक्षासूत्र, जीवनसूत्र व विचाराचे सूत्रच हाती दिले. त्यामुळे आजही आपण आदराने त्यांच्या नावाचा उल्लेख करून साहित्याचे मंथन करतो. परिवर्तनवादी विचाराचा धागा संत तुकारामाच्या अभंगात जागोजागी आढळून येतो.

विचाराचे आकर्षण असून देखील विचार आत्मसात करता येत नव्हते. अशा काळात संत ज्ञानेश्वरासारख्या संतांनी तत्कालीन समाजाच्या भाषेत तत्त्वज्ञान व विचाराची पेरणी केली. डॉ. ल. का. मोहरीर यांनी "संत ज्ञानेश्वर म्हणजे महाराष्ट्राच्या वैचारिक क्रांतीचा उषःकाल होय."[९] असे म्हटले आहे. याचा प्रत्यय 'ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव', 'चांगदेव पासष्ठी' व 'हरिपाठाचे अभंग' यातून येतो. एकंदरीत ज्ञानेश्वरांचे वाङ्मय नीतिमूल्यांचे संवर्धन करणारे व सामाजिक समतेचा स्वीकार करणारे आहे. संत साहित्य हे माणूसधर्म जाणविणारे व शिकविणारे वाङ्मय आहे.

सोळाव्या शतकातील एक महान संत म्हणजे एकनाथ होत. लोकशिक्षकाची, प्रबोधनकाराची, उपदेशकाची व समाजशिक्षकाची भूमिका संत एकनाथांनी समर्थपणे पार पाडली. संत एकनाथ हे लोकनाथ म्हणून ओळखले जातात. साडेतेराशे ते सोळाशे दरम्यानचा हा अडीचशे वर्षांचा कालखंड हा वारकरी संप्रदायाच्या व साहित्याच्या दृष्टीने तमोयुग म्हणून ओळखला जातो. संत एकनाथांनी



अनुक्रमणिका

स्वतःच्या विचाराने, आचाराने मराठी संस्कृतीची व भाषेची एक प्रकारे सेवाच केली. संत एकनाथांनी जातीपेक्षा गुण श्रेष्ठ असल्याचे सांगितले. संत एकनाथांना मानव जात महत्त्वाची वाटते. 'का रे महारा....' सारख्या भारुडातून जातिभेदाची व्यर्थता नाथांनी पटवून दिली. समाजोद्धाराची तळमळ नाथांच्या साहित्यातून जागोजागी पाहावयास मिळते. त्यांचे वाङ्मयीन कर्तृत्व व सांस्कृतिक कर्तृत्व समन्वयवादी व्यक्तिमत्त्वाचे निदर्शक आहे. भारुडाच्या माध्यमातून रंजन करत डोळ्यात अंजन घालणा-या नाथांच्या एकनाथी भागवता बरोबरच इतरही साहित्यात वैचारिकता आली आहे.

मध्ययुगीन काळात वैचारिक नेतृत्व संत एकनाथांनी स्वतःकडे घेऊन समर्थपणे वाटचाल केली. "बहामनी राज्याचा अंत झाल्यावर दक्षिणेत ज्या पाच शाह्या झाल्या, त्यांच्यातील अंतर्गत वैमनस्यामुळे मुसलमान राज्यकर्त्यांना येथील ब्राह्मण व मराठा वर्गाचे साह्य घ्यावे लागले. परकीय पातशाहीची चाकरी इमानेइतबारे बजावीत असता या देशमुख, देशपांड्याचे वजन उत्तरोत्तर वाढत गेले व त्यांच्या मनात अधिकाराच्या व ऐश्वर्याच्या आकांक्षा अधिकाधिक बळावत गेल्या. भौतिक जीवनातील या घडामोडीचे प्रतिबिंब धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रात पडल्याशिवाय राहिले नाही. पीछेहाटीच्या काळातील निराशा व औदासीन्य नाहीसे होऊन त्यांची जागा धर्म, भाषा व संस्कृती यांच्या अभिमानाने घेतली. लोकांच्या जीवनातील मावळलेला उत्साह पुन्हा दिसू लागला. मध्यंतरी खुंटलेली वाङ्मयाची परंपरा अधिक व्यापक स्वरूपात सुरू झाली. महाराष्ट्रातील या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे श्रेय एकनाथांना दिले पाहिजे. कारण त्यांच्या धार्मिक व वाङ्मयीन कार्यानेच शिवपूर्वकाळातील वैचारिक आंदोलनास प्रारंभ झाला."[१०] संतांना दिवा व झाडाची उपमा देता येईल. झाड लावणा-याला तोडणा-यालाही सावली देत असते. दिवा परक्यांना घरच्यांना प्रकाश देतो. तद्वतच संत एकनाथांचे साहित्य सर्वसमावेशक आहे. "निजरूपे सर्वसमता। समचि देखे सर्वांभूता।।"[११] ही एकनाथांचे एकनाथी भागवतातील रचना याची प्रचिती आणून देते. समताधिष्ठित समाजरचना हे संतांचे स्वप्न होते.

संत एकनाथानंतर शिवकाळातील समाजसुधारक व विचारवंत म्हणून समर्थ रामदासाचा उल्लेख करावा लागेल. सतराव्या शतकातील संत परंपरेतील एक निराळे कवी व संत म्हणून समर्थ रामदासाकडे पाहिले जाते. 'केल्याने होत आहे रे आधी केलेचि पाहिजे' या वचनाचा प्रत्यय रामदासाचे कार्य व विचारातून येतो. प्रयत्नवादाचा पुरस्कार समर्थ रामदासांनी केलेला आहे. त्यांचा 'दासबोध' हा ग्रंथ तर विचाराचे भांडार आहे. विचारवंतांची भूमिका या ग्रंथाद्वारे समर्थ रामदासांनी समर्थपणे पार पाडली. या ग्रंथाला कुठलाच विषय वर्ज्य नाही. समाजाला ज्ञानसंपन्न करून विवेकनिष्ठ बनविणे हा त्यांच्या लेखनामागचा मुख्य हेतू आहे. समर्थ रामदास मध्ययुगीन काळातील संतांमध्ये राष्ट्रवादाचे जनक आहेत. 'मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा' यासारख्या वचनातून याचा प्रत्यय येतो. सामाजिक, धार्मिक, राजकीय व सांस्कृतिक क्षेत्रात आमूलाग्र बदल घडवून आणणारे विचार रामदासांनी मांडले. समर्थ रामदासांनी धर्मप्रसारा-साठी देवळे बांधली. गावोगावी मारुतीची मंदिरे उभी केली. मारुतीची मंदिरे केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर आंध्रप्रदेश व कर्नाटकातही बांधली गेली आहेत. देवांचे सार्वजनिक उत्सव सुरू केले. सामाजिक जीवनाची नैतिक परिशुद्धी करणे हे रामदासांच्या राजकारणाचे मर्म होय. या माध्यमातून प्रबोधनाचा ध्वज संतांनी हाती घेतला.

चळवळी गतिमान झाल्याशिवाय सुधारणा अशक्य आहे. कोणतीही सामुदायिक उठावणी चळवळीवाचून होत नाही. आज चळवळी क्षीण झालेल्या आहेत. चळवळीत जिवंतपणा कुठेच दिसून येत नाही. 'चिंता करितो विश्वाची' अस लहानपणी रामदासानी म्हटले होते. विचारवंतांची लक्षणे लहानपणापासूनच रामदासाच्या व्यक्तिमत्त्वात दिसून येत होती. एकंदरीत रामदास विचारक्रांतीचे प्रवर्तकच होते. "तत्कालीन सामाजिक बेबंदशाही नष्ट करून न्यायनितीची स्थापना करण्याचा म्हणजे रामराज्याच्या उपाय कोणता ह्या संबंधीचे त्यांचे चिंतन त्यांच्या दासबोधात प्रकट झाले आहे."[१२] सामाजिक न्याय व नीतीच्या दृष्टिकोणातून रामदासांचा 'दासबोध' ग्रंथ महत्त्वाचा असल्याचे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

यांनी सांगितले. एकंदरीत विचार हा रामदासांच्या साहित्याचा प्राण आहे. त्यांच्या समग्र साहित्यातून वैचारिकतेचे दर्शन घडते. सर्व क्षेत्रातील सम्यक विचार समर्थांच्या 'दासबोधा'त आले आहे.

संतांनी प्रबोधन मानवतेच्या विकासासाठी केले. जीवनमूल्ये व सद्‌विचारांची पेरणी केली. धार्मिक जोखडाखाली वाकलेल्या, झुकलेल्या समाजाला ताठ मानेने उभे टाकण्यास बळ दिले. "संत साहित्यातील पाखंडखंडनात्मक लेखनाने या अंधश्रद्धांवर, स्वार्थी पुरोहिततत्त्वावर, बुवाबाजीवर, निष्फळ कर्मकांडावर कठोर प्रहार केला आहे. विवेकनिष्ठा हे संत साहित्याचे अधिष्ठान असल्याने व ही विवेकनिष्ठा तसेच अंधश्रद्धा निर्मूलन ही आजच्या काळाची गरज असल्याने आजही संत साहित्य मध्ययुगाइतकेच आवश्यक आहे. अनेक दैवतवाद, अनावश्यक कर्मकांड व व्रतवैकल्य, पुरोहितांचा पोटभरूपणा, नवससायास ही सामाजिक दुखणी आजही आपल्याला आढळतात. या संदर्भात जनसामान्यांचे प्रबोधन करण्यासाठी संत साहित्य हे महत्त्वाचे प्रसार माध्यम आहे."[१३] एकविसाव्या शतकात संत साहित्याची काय आवश्यकता आहे? याचे विवेचन वरीलप्रमाणे स्नेहल तावरे यांनी केले. संत साहित्यात केवळ विचार नाही, तर विवेक आहे. विवेकनिष्ठा हे संत साहित्याचे बलस्थान होय. विचाराची पुढची पायरी म्हणजे विवेक होय.

संतांच्या लेखनात स्वांतत्र्य, समता, बंधुता, मानवता, वात्सल्य, परोपकार, दया, करुणा व विज्ञान आदीचा समावेश आहे. संतांनी माणसाला केंद्रभूत मानून वाङ्मयाची निर्मिती केली. संतांचे प्रयोजन केवळ तात्कालिक नाही, तर सार्वकालिक आहे. जीवनवादी, नैतिकमूल्यांची पेरणी साहित्यातून संतांनी केली असल्यामुळे संत साहित्य अजर, अमर व अक्षर साहित्य ठरले. याशिवाय संत चोखामेळा व संत तुकाराम यांच्या अभंगातही वैचारिकतेच दर्शन घडते. सामाजिक समतेसाठी चोखामेळांनी केलेला संघर्ष अस्वस्थ करतो. वारकरी संप्रदायातील लोकप्रिय कवी संत तुकाराम होत. जीवनमूल्ये हा त्यांच्या अभंगाचा श्वास आहे.

संत तुकारामांच्या चतुःशताब्दी वर्षानिमित्त फेब्रुवारी २००९ मध्ये दिल्ली येथे 'सबद गायन : संत तुकाराम और भक्ती परंपरा' या विषयावर साहित्य अकादमीच्या वतीने राष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले होते. तीन दिवस या चर्चासत्रात मलाही उपस्थित राहता आले. 'संत तुकाराम एवं ब्राह्मणेत्तर आंदोलन' या शीर्षकाखाली वाचलेल्या शोधनिबंधात डॉ. किशोर सानप लिहितात, "सतरहवी शताब्दी के लोक जागरण का विवेकवादी एवं विज्ञानवादी जन आंदोलन चलाकर एक जन सामान्य किसान, एक जन सामान्य वाणी, एक जन सामान्य शूद्र व्यक्ती महाराष्ट्र के भागवत धर्म का भक्ती परंपरा आंदोलन का धर्म गुरू बना। समाज के पारलैकिक और लैकिक कल्याण का मसीहा बना। इन्सान अपने कर्म से और आचरण से श्रेष्ठ होता है। भक्ती से एवं समाज के दीन दलितों की सेवा करने से श्रेष्ठ बनता है। तुकाराम ने वर्ण वर्चस्व के मानदंडो को दूर कर समाज मे नैतिकता और समतावादी आचरण की प्रेरणा दी। संसार-परमार्थ के संयोग का मूलमंत्र भक्ती बताया।"[१४] भक्ती ही सामाजिक शक्ती असते हे संत तुकारामांनी दाखवून दिले. "भागवत धर्माच्या दीर्घ परंपरेची पूर्ती तुकारामांच्या जीवनात आणि साहित्यात झालेली होती. अनन्यभक्ती आणि पारमार्थिक समता ह्यांच्या मुशीत भागवत धर्माने ओतलेली सुवर्णमूर्ती म्हणजे तुकाराम"[१५] तुकोबांच्या काळात पारमार्थिक समता निर्माण करणे देखील आव्हानात्मक होते. संघर्षमय जीवन जगत तुकोबादी संतांनी मात्र ते कार्य केले. संत साहित्यात काय आहे? असा प्रश्न विचारला जातो. त्यांनी मध्ययुगीन काळातील संतांचे साहित्य वाचल्यास या प्रश्नाचे उत्तर मिळून जाईल. संत तुकाराम मराठवाड्याचे नसले तरी वैचारिकता व मानवी मूल्यांचे समग्र दर्शन तुकोबांच्या अभंगातून घडते. यासाठीच हे चिंतन केले आहे. याशिवाय चक्रधर स्वामी, शेख महमद, संत चोखामेळा आदी कितीतरी संतांच्या साहित्यात वैचारिकतेचे दर्शन घडते.

वीरशैव संप्रदायातील कवी संत मन्मथस्वामी यांचे अभंग शिवभक्तिच्या प्रेरणेतून निर्माण झालेले असले तरी त्यांच्या उपदेशपर अभंगात मानवतावाद पाहवयास मिळतो. वारकरी संप्रदायात जितकी लोकप्रियता संत तुकारामाना मिळाली तितकीच लोकप्रियता वीरशैव संप्रदायात मन्मथ स्वामींना मिळालेली आहे. मन्मथ

अनुक्रमणिका

स्वामींची वैचारिकता 'परमरहस्य' या ग्रंथाबरोबरच त्यांच्या अभंगवाणीत जागोजागी अनुभवायला येते.

मानवी मूल्यांबरोबरच व्यक्तिमत्त्व विकासाचा आदर्श असा मूलभूत पायाच संतांनी घातला. संतांनी शूद्रांना, दीन-दलित व दुबळ्याना जवळ करून समतेच्या प्रवाहात आणले. संतांचे कार्य परिवर्तनवादी चळवळीचा एक भाग म्हणून लक्षात घेतला पाहिजे. एकविसाव्या शतकात भारतातील संतांची शिकवण राष्ट्रीय एकात्मता निर्माण करण्यासाठी उपयुक्त ठरणार आहे. संतांचे साहित्य अनुभवसापेक्ष, लोकसापेक्ष व भावप्रधान आहे. संत साहित्य मूल्यांचा एक अक्षय स्रोत आहे. संत विचार केवळ पारायणाचा प्रांत नसून तो दैनंदिन आचरणाचा विषय आहे. संतांची विचारप्रणाली क्रांतिकारक नसली तरी सुधारणावादी होती. संतांनीच महाराष्ट्राला वैचारिक बैठक मिळवून दिली, हे नाकारता येत नाही. वैचारिक साहित्याचे सरोवर म्हणून संत साहित्याकडे पाहिल्यास भारत नैतिकदृष्ट्या समृद्ध होईल यात तीळ मात्र शंका नाही.

**संदर्भ** :


१. बाबा महाराज आर्वीकर, दिव्यामृतधारा, खंड-१, मोक्षधाम प्रकाशन मंडळ, माचणूर, १९६६, पृ. ४७.

२. यु. म. पठाण, 'समता आणि संत साहित्य', समता म्हणजे काय? (संपा. नागोराव कुंभार), १९८८, पृ. १.

३. यु. म. पठाण, 'संत साहित्य आणि वर्णव्यवस्था : न्याय संकल्पनेच्या संदर्भात एक पुनर्मूल्यांकन', न्याय म्हणजे काय? (संपा. नागोराव कुंभार), १९८८ पृ. ३.

४. मु. श्री. कानडे, उद्धृत, संत साहित्य : संदर्भ कोश खंड पहिला, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९५, पृ. २०१.

५. गं. बा. सरदार, 'सन्तवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती', श्री विद्या प्रकाशन, पुणे, चौ. आ., १९८२, पृ. १३६-१३७.

६. शरदचंद्र देगलूरकर, 'संत साहित्याचा सामाजिक अन्वयार्थ', चंद्रशेखर एकनाथ महाराज देगलूरकर, शके १९२६, पृ. २३५.

७. ललिता मिरजकर, 'संत नामदेव : अंधश्रद्धा निराकरणाचे अग्रदूत', संत साहित्य आणि अंधश्रद्धा निर्मूलन (संपा. प्राचार्य रा. तु. भगत), चैतन्य प्रकाशन, कोल्हापूर, २००२, पृ. ९०.

८. सूर्यनारायण रणसुभे, 'दलित साहित्य की वैचारिक पृष्ठभूमि', उत्तराशती चिंतन विधियाँ, रणसुभे गौरव ग्रंथ (संपा. डॉ. सुरेश माहेश्वरी व प्रा. नागनाथ कुंटे), भावना प्रकाशन, दिल्ली, २००२, पृ. ३७.

९. ल. का. मोहरीर, 'मराठवाड्यातील संतांनी उद्योगनिष्ठ समाज घडविला', मायबोलीचा मराठवाडा (संपा. श्रीराम पाटील), योगेश प्रकाशन, औरंगाबाद, इसवीसनाची नोंद नाही, पृ. १७०.

१०. उनि., सन्तवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती, पृ. १२७.

११. संत एकनाथ-उद्धृत (ए. भागवत, ११-८५७), ह. श्री. शेणोलीकर, मराठी-संत-तत्त्वज्ञान : संज्ञाकोश, एस. एच. क्रिएशन्स, पुणे, १९९४, पृ. ५१५.

१२. लक्ष्मणशास्त्री जोशी, 'रामदास', मराठी वाङ्मयकोश, खंड पहिला मराठी ग्रंथकार, इ. स. १०५०-१८५७, (संपा. गं. दे. खानोलकर), म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई, १९७७, पृ. ३०७.

१३. स्नेहल तावरे, ज्ञानेश्वरी व विसावे शतक, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९०, पृ. ३४.

१४. किशोर सानप, 'संत तुकाराम एवं ब्राह्मणेत्तर आंदोलन', (अप्रकाशित शोधलेख), राष्ट्रीय संगोष्ठी, १९-२१ फरवरी २००९, इंडिया इंटरनेशनल सेंटर ४०, मैक्स मूलर मार्ग, नई दिल्ली-११०००३.

१५. लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा.) : मराठी विश्वकोश, खंड ७, म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई, १९७७, पृ. ३९३.













पुस्तक परीक्षण :

# पाण्याशप्पथ

रमेश आगाशे

वरील लक्षवेधक शीर्षक असलेले पुस्तक नेमके काय सांगणार आहे हे 'कुतूहल' पुस्तक वाचताना सहज उलगडते आणि पुस्तकांच्या शीर्षकाचा विस्तारित अर्थ 'पाण्याशप्पथ पाण्याबद्दल खरं खरं बोलीन' हा स्पष्ट होतो. लेखक प्रदीप पुरंदरे औरंगाबादमधील वालमी ह्या महत्त्वाच्या संस्थेतील निवृत्त जेष्ठ प्राध्यापक आहेत. तिथे त्यांनी गेल्या अनेक वर्षांत सिंचन क्षेत्रात प्रत्यक्ष काम करणा-या अनेक अभियंन्त्यांचे प्रशिक्षण केले असल्याने त्यांनी सिंचन ह्या विषयाचा सूक्ष्म अभ्यास व चिंतन केलेले आहे.

'बरे सत्य बोला यथातथ्य चाला' हा समर्थ रामदासांचा उपदेश पटलेल्या लेखकाने सिंचन क्षेत्रातील वेगवेगळ्या पैलूंवर अनेक वर्षांपासून सातत्याने नियतकालिकातून आणि वृत्तपत्रातून लेखन करून एका जबाबदार 'जागल्या'ची भूमिका पार पाडली आहे. प्रस्तुत पुस्तकातील चौदा प्रकरणांमध्ये अशा सर्व लेखनाचा सारांश उतरलेला आहे. त्यामधून पाणी आणि सिंचन ह्या विषयाबद्दलचे व्यापक चिंतन आणि कळकळ आपल्यापुढे येते. त्यांचा ह्या क्षेत्रातील अभ्यास व अधिकार लक्षात घेवून शासनाने त्यांची काही महत्त्वाच्या समित्यांवर नेमणूक केली होती.

ब्रिटिशकालीन शासनामधून 'कायद्याचे राज्य' हा प्रशासनाचा मूलमंत्र आपण सहजपणे उचलला आहे. त्यामुळे सर्वच शासकीय व खाजगी क्षेत्रातील कृतीला कायद्याचा आधार जरूरी असतो. जल, जमीन, जंगल ह्या नैसर्गिक संपत्तीचा वापर करण्यासाठी तसा कायदेशीर हक्क शासनाकडून मिळवावा लागतो. देशात वाहणारे सर्व नदी, नाले, तलाव इत्यादींमधून मिळणारे पाणी (भूजल हा अपवाद) सरकारी मालकीचे असल्याने सिंचन व्यवस्था उभारण्यापूर्वी त्याचा हक्क रेव्हेन्यू खात्याकडून सिंचन विभागालाही मिळवावा लागतो. सध्या अनेक अनियंत्रित लिफ्ट योजना, नाला रूंदीकरण खोलीकरणाच्या कामासाठी अशा परवानग्या घेतल्या नसल्यास पुढे त्यामधून कायदेशीर अडचणी निर्माण होऊ शकतात असे लेखक दाखवतो.

सुरुवातीला जलक्षेत्राच्या व्याप्तीचा विस्तृत आढावा घेताना आजवरच्या उपलब्धी आणि निर्माण झालेल्या अडचणींची योग्य आकडेवारीच्या आधाराने चर्चा केलेली आहे. त्यामधील असंख्य त्रुटी नोंदवून लेखकाला प्रचलीत व्यवस्था एक फंक्शनिंग अनार्की असल्याचे वाटते. असे धक्कादायक निष्कर्ष पुढील अनेक प्रकरणात भेटत राहतात. त्यामुळे जलक्षेत्रातील सर्वच प्रश्नांचे बदललेल्या परिस्थितीत आकलन करायला हवे असे लेखकाला वाटते.

जलनीतीची चर्चा करताना त्यामधील वेगवेगळे पाच टप्पे त्या त्या वेळच्या परिस्थितीच्या दबावामुळे कसे बदलत गेले हे स्पष्ट केले आहे. पहिला आधुनिकता पूर्व टप्पा, दुसरा मोठी धरणे आणि लांब कालवे हा टप्पा. पर्यावरण स्नेही वापर हा तिसरा, पाणी ही बाजार मूल्य असलेली वस्तू हा चवथा आणि पाणी वापर हक्क, नदी खोरे निहाय नियोजन, समन्यायी वाटप आणि भूपृष्ठावरील व भूगर्भातील पाण्याचा एकत्रित विचार हा पाचवा टप्पा. ह्या मांडणीच्या शेवटी इथून पुढे पाणी हा विकासातील केंन्द्रबिंदू मानून पाणी प्रश्नाला जर सक्षमपणे सामोरे जायचे असेल, तर आपल्या प्रशासकीय रचना ह्या पाणीलोट क्षेत्र, नदीचे खोरे, उपखोरे ह्या नैसर्गिक रचनेशी सुसंगत करून निसर्गावर मात करण्यापेक्षा निसर्गाशी जुळवून घेणा-या कराव्या लागतील असे लेखकाचे मत आहे.

महाराष्ट्रात जलव्यवस्थापन करण्यासाठी पाच वेगवेगळे कायदे करण्यात आलेले आहेत. कायद्यांची अंमलबजावणी करण्यासाठी त्यांचे नियम करून ते अधिसूचित करणे जरूरी असते. तसे जर केले नाही, तर कायदे असून नसल्यासारखे होते. १९७५ सालचे अधिनियम हा सिंचन क्षेत्रातील पायाभूत कायदा असून तो केल्यानंतर पूर्वीचे अधिनियम आपोआपच निरस्त

होतात. पण आश्चर्य असे की, अधिनियम केल्यानंतर ४० वर्षांपर्यंत त्याचे नियमच बनलेले नाहीत. त्यामुळे पूर्वी बनलेल्या १८७९ अधिनियमा अंर्तगत १९३४ साली मुंबई प्रातांसाठी बनलेले व १९४६ साली मध्यप्रांतातील नियम विदर्भसाठी आजही वापरात आहेत. जे हे जुने नियम लागू आहेत त्यातली ही 'ऊसाखालील क्षेत्राला प्रत्येक पाच वर्षांत दोन वर्षेच पाणी द्यावे' ही अट सोयीस्करपणे विसरलेली आहे. त्यामुळे सध्या अस्तित्वात असलेल्या व्यवस्थेचा कायदेशीर पायाच ठिसूळ आहे. प्रागतिक राज्याचे हे चित्र धक्कादायक आहे.

महाराष्ट्र शासनाने जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचा कायदा २००५ साली करून आपले अनेक अधिकार प्राधिकरणाकडे वर्ग केले. पाणी वापराचे हक्क ठरवणे ही महत्त्वाची बाबही त्यांचेकडे सोपवली. त्यामुळे पाण्याबद्दल दाद मागण्यासाठी एक नवे व्यासपीठ निर्माण झाले. असे स्वतःचे अधिकार प्राधिकरणाकडे सोपवणारे पहिलेच राज्य असाही बोलबाला करण्यात आला. पण पुढे शासनाने त्यातले काही अधिकार सहजपणे काढून घेवून स्वतः केलेल्या कायद्याचीच बूज राखली नाही. ह्या प्राधिकरणावर जलव्यवस्थापनाचे ज्ञान किंवा अनुभव नसलेल्या अनेक उच्चपदावरील व्यक्तींनी स्वतःची वर्णी लावली. ह्या सर्वच नेमणुका राजकीय आहेत. गेल्या ११ वर्षांपासून कायद्यात २२ तरतूदी असूनही प्राधिकरणाकडून कुठलेही महत्त्वाचे निर्णय झालेले नाहीत.

इतर कायद्यांबाबतची परिस्थितीही विशेष चांगली नाही. भूजल नियंत्रणाचा २००५ चा कायदा दहा वर्षे उशिरा आल्याने त्याआधीच भूजलाचे मोठे नुकसान झाले होते. शेतक-यांच्या स्वयंव्यवस्थापनात अनेक प्रश्न नव्याने निर्माण झाले आहेत. उपसा सिंचनासाठीही पाणी वापर संस्था निर्माण होणे जरूरी असताना हा कायदा फक्त जलसुधारान्त प्रकल्पा अंतर्गत प्रकल्पांनाच लागू आहे. सहकारी उपसा सिंचन योजनासाठीच्या अधिसूचनाही गेल्या ४० वर्षांत काढलेल्या नाहीत. त्यामुळे मोठ्या प्रमाणात नदी-नाले जलाशयांमधून होणारे उपसा सिंचन कोणत्याच कायद्याच्या कक्षेत येत नाही. पाच प्रमुख नदी खो-यांसाठी महामंडळे स्थापन करण्यासाठी पाच वेगवेगळे कायदे करण्यात आले आहेत. पण आद्यपपर्यंत कोणत्याही महामंडळाने स्वतःचे तेथील प्रादेशिक गरज लक्षात घेवून वेगळे नियम किंवा प्रशासकीय नियम बनवलेले नाहीत. अनेक सिंचन प्रकल्पात लाभ क्षेत्राचे अभिसूचितीकरण झालेले नाही. जेथे झाले तेथे उपसा सिंचनाचे झालेले नाही. त्यामुळे प्रवाही विरुद्ध उपसा सिंचन ह्या संघर्षात उद्या प्रवाही सिंचन मागे पडणार आहे.

वरील चर्चेमधून कदाचित ह्या पुस्तकात केवळ दोष दिग्दर्शन केले आहे असा गैरसमज होवू शकतो. पण प्रत्येक कायद्याची खुलासेवार चर्चा करतानाच परिस्थिती सुधारण्यासाठी काय उपाय करणे जरूरी आहे हे पण सविस्तरपणे मांडले आहे.

प्रत्यक्ष सिंचन व्यवस्थापनामध्ये पाण्याचे समन्यायी वाटप हे महत्त्वाचे अंग असल्याने पाण्याच्या प्राथमिक इरिगेशन प्लॅन पासून शेवटी जललेखा ह्या विषयाची सविस्तर चर्चा करताना त्यातल्या असंख्य त्रुटींवर नेमके बोट ठेवले आहे. सध्या व्यवस्थापनात मोघमपणा व चलता है ही वृत्ती घुसल्याचे पुरंदरे म्हणतात. पुढे 'मेरीने केलेल्या (कालव्यातील) गाळाच्या अभ्यासाचे काय झाले हे पाहिले, तर संबंधितांना मुसक्या बांधून हजर करा व कडेलोटाची शिक्षा द्या' असे जहाल विधान येते.

कालवा देखभाल दुरुस्ती हा पाणी शेवटापर्यंत पोचविण्यासाठी खूप महत्त्वाचा विषय आहे. त्यावर सालोसाल प्रचंड पैसा खर्च होवूनही आज साठवणातून सोडल्या जाणा-या पाण्यापैकी केवळ २०-२५ टक्के सिंचनासाठी मिळते. ही पाणी गळती थांबवण्याच्या मिशाने पैशाची मोठी गळती कशी केली जाते ह्याचे बारकावे ह्या प्रकरणात उलगडले आहेत. ही चर्चा करताना लेखकाने पर्यायी नळांद्वारे पाणी पुरवण्याची चर्चा केली असती, तर बरे झाले असते असे सुचवावेसे वाटते. ह्या मधून सुरुवातीला मोठा खर्च झाला तरी पुढे देखभाल दुरुस्तीमधील गळती कमी ठेवता येईल.

म. ज. नि. प्रा. अधिनियम २००५ अन्वये राज्य जल मंडळाने तयार केलेल्या एकात्मिक राज्य आराखड्यास रीतसर मान्यता मिळाल्यानंतरच नवे प्रकल्प हाती घ्यायचे होते. पण असा आराखडा तयार नसतानाही कायद्याचे उल्लंघन करून १८९ प्रकल्पांना मान्यता देण्यात आली. म्हणजे कायदे एकीकडे व व्यवहार दुसरीकडे.

ह्या विरुद्ध लेखकाने दाखल केलेल्या जनहित याचिकेची औरंगाबाद उच्च न्यायपीठाने दखल घेतल्याने इथून पुढे तरी जलक्षेत्रात कायद्याचे राज्य प्रस्थापित होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. लेखकाची जनतेच्यावतीने केलेली ही कृती खूप स्पृहणीय आहे.

सिंचन घोटाळा ह्या गंभीर प्रकरणाची दखल घ्यावी लागल्याने वस्तूस्थिती मांडण्यासाठी शासनाने श्वेत पत्रिका काढली. त्यातील भूमिका समर्थनीय न वाटल्याने संबंधितांनी पीत पत्रिका आणि हरित पत्रिका काढल्याने वाद पेटला. लेखक म्हणतो सत्ताधारी वर्गांनी पाण्यात राजकारण आणले. 'सिंचन प्रकल्प म्हणजे एक एटी-एम् असे मानले जाऊ लागले. राजकारणासाठी, पक्षासाठी, कार्यकर्ते सांभाळण्यासाठी पैसा हवा मग सुरू करा सिंचन प्रकल्प, प्रकल्प स्थळी पाणी उपलब्धता पत्र नाही म्हणून पाण्याची शाश्वती नाही. पण विकास तर आपल्या भागात खेचून आणायला हवा. ठेकेदार जगले पाहिजेत, बांधा प्रकल्प, काढा टेंडर, पाण्याचे नंतर बघू.' असा गहजब झाल्याने शासनाने शेवटी विशेष चौकशी समिती नेमली. पण निर्मित सिंचन क्षमता आणि प्रत्यक्षात सिंचित क्षेत्र ह्यांच्या विश्वसनीय माहिती अभावी ठाम निष्कर्ष शक्य होणे कठीण.

जेष्ठ जलतज्ज्ञ चितळेंच्या अध्यक्षतेखाली विशेष चौकशी समिती नेमून त्यांचेकडे सर्व उपलब्ध माहिती दिली गेली. चितळेंना ओळखणा-या सर्वांना ते विषयाची सर्व अंगांनी सूक्ष्म चिकित्सा करून जिथे सबळ पुरावे समर्थनीय आहेत तेवढेच ग्राह्य मानून निष्कर्ष काढतात हे माहिती आहे. लेखक म्हणतो समितीने सखोल समग्र व दर्जेदार अभ्यास केला आहे एवढेच नव्हे, तर खूप स्फोटक तपशील ही अहवालात दिला आहे आणि त्याप्रमाणे काही कडक ताशेरेही ओढले आहेत. पण लेखकाचा मुख्य आक्षेप हा - - - की तपशीलाला साजेशा कारवाईच्या शिफारसी कां केल्या नाहीत? जलसंपदा मंत्री, दोन्ही सचिव यांना स्पष्टपणे जबाबदार का धरले नाही? लेखक मराठवाड्याचे रहिवासी असून पाणी वापरात त्या भागाला योग्य वाटा मिळावा ह्यासाठी तळमळीने काम करत असल्याने त्यांची नाराजी आपण समजू शकतो. कोण दोषी कोण निर्दोषी ह्याचा निर्णय शेवटी राजकीय तडजोडीतून होणार का न्यायालयातून हे ठरवण्याचा अधिकार शासनाचा असल्याने चौकशी समितीने न्यायालयीन भूमिका टाळली असण्याची ही शक्यता आहे. पण अहवालातील तपशीलात खूप स्फोटक माहिती असल्याने त्यातून पुढे लांब फ्यूजचा स्फोटक टाईम बॉम्ब फुटू शकतो. कार्यकर्त्यांना हे करता येईल.

मराठवाड्याचा पाणी प्रश्न जायकवाडीचा प्रकल्प आणि शिरपूर प्रयोगाचा गाजावाजा ह्या बद्दलही स्वतंत्र प्रकरणे आहेत.

लेखकाची बरीच मते वास्तवावर आधारलेली असल्याने समर्थनीय आहे. अभिव्यक्ती नीट, धीट आणि स्पष्ट आहेत. भाषा शैली समृद्ध आणि बोलकी असल्याने लेखकांची कठोर भूमिका आपण समजू शकतो. पण लेखकाने चौकशी समितीच्या अध्यक्षांबद्दल आदर व्यक्त करतानाच काही व्यक्तिगत स्वरूपाची विधाने केली आहेत. ती टाळता आली असती असे वाटते.

एकूण हे पुस्तक लिहून पुरंद-यांनी सिंचन व व्यवस्थापनातील अक्षम्य, अनागोंदीचा, दिरंगाईचा, कायद्याचे सहज उल्लंघन करण्याचा, भ्रष्टाचाराला वाव देण्याचा आणि राजकीय दबावाचा पर्दाफाश केलेला आहे. एक त-हेचे हे वस्त्रहरण आहे. अशा त-हेचा कडू डोस देत. सिंचन व्यवस्थेचे आरोग्य दुरुस्त करण्याची खूप गरज होती. ते कडू काम धीटपणे केल्याबद्दल लेखकाचे मनापासून अभिनंदन. शासन ह्याची योग्य दखल घेईल अशी आशा करूया.

ज्यांना सिंचन व्यवस्थापन गंभीरपणे समजून घ्यायचे आहे व सिंचनाशी संबंधित मंत्र्यांपासून कनिष्ठ अभियंत्यांसाठी हे 'मस्टरीड' असे झाले आहे.

पाण्याशप्पथ : लेखक प्रदीप पुरंदरे.
प्रकाशक : राजन बावडेकर
लोकवाङ्मय गृह, मुंबई.
पृष्ठे : २६०
किंमत रु. २००/-



अनुक्रमणिका








पुस्तक परीक्षण :

# ज्ञानेश्वरीचे वाङ्‌मयीन वैभव

मृणालिनी शहा.

नामदेव - तुकारामाच्या अभंगाबद्दल सामान्य माणसांना प्रेम आहे. ज्ञानोबाच्या अभंगाबद्दल आत्मीयता वाटत असते. 'ज्ञानेश्वरी'ची पारायणे करणारे किंवा पंढरीच्या विठोबाबद्दल भक्ती असणारे आपल्याला ठाऊक असतात. परंतु 'ज्ञानेश्वरी'चा अभ्यास करण्यास मात्र संशोधकांशिवाय कोणी धजत नाही, हे ही तितकेच खरे आहे. 'ज्ञानेश्वरी' चा संशोधकांनी सखोल आणि सर्वांगीण अभ्यास केलेला आहे. तिच्यातील साहित्यिक गुणांचा शोधदेखील अभ्यासकांनी घेतलेला वाचकांना ठाऊक आहे. त्याच परंपरेतील डॉ. लीला गोविलकर यांचा 'ज्ञानेश्वरीचे वाङ्‌मयीन वैभव' हा ग्रंथ आहे.

या ग्रंथाला 'ज्ञानेश्वरीचे वाङ्‌मयीन वैभव' असे शीर्षक जरी दिलेले असले तरी यामध्ये त्यातील फक्त वाङ्‌मयीन सौंदर्याचा वेध घेतला आहे, असे नाही. अर्थात त्यांनी ज्ञानेश्वरीतील काही ओव्यांचे सौंदर्य, शांतीसुखाचा प्रादुर्भाव आणि ओवी मांडणीचे अगत्य स्पष्ट केले आहे. तथापि प्रामुख्याने 'ज्ञानेश्वरी' लिहिण्यामागचे ज्ञानेश्वरांचे उद्दिष्ट काय होते, हे त्यांनी सुस्पष्ट केले आहे आणि त्याहुन महत्त्वाचे म्हणजे त्या उद्दिष्टानुसार ज्ञानेश्वरीची रचना कशी सुयोग्य आहे, हे दाखवून दिले आहे. या ग्रंथातील सर्व विवेचन त्या हेतूने झालेले आहे.

ज्ञानेश्वर संत होते. त्या संतत्त्वाला योग्य अशी रचना केली. वारकरी संप्रदायामध्ये "संत" या शब्दाला असणारा विवक्षित अर्थ त्यांनी विदित केला आहे. गीतेतील यथार्थाला ज्ञानेश्वरांनी संतत्त्वाचा लेप दिला आणि शांतरसात्मक साहित्यकृती घडवली. हे करत असताना यथार्थ गाळला नाही किंवा त्याला दुय्यम असे स्थानही येऊ दिले नाही; असे सार्थ विवेचन, गोळविलकर बाईंनी साधार सादर केलेले आहे. हा सर्व भाग अत्यंत शिस्तबद्ध पद्धतीने मांडला आहे. त्यांच्या मते हेच ज्ञानेश्वरीचे खरे "वाङ्‌मयीन वैभव" आहे. ज्या उद्देशाने ज्ञानेश्वरांनी गीतेचा यथार्थ सर्व सामान्यांना सांगितला त्या उद्देशामध्येच ज्ञानेश्वरीचे वाङ्‌मयीन वैभव आहे आणि हे वैभव सांगणे हेच त्यांचे गृहीतक आहे. त्या गृहीतकाची सिद्धता त्यांनी पुस्तकात केली आहे.

पहिल्या प्रकरणात ह्या विषयाचे महत्त्व प्रतिपादन केले आहे. महाविद्यालयात शिकत असताना आणि नंतर सारडा महाविद्यालयात शिकवण्याच्या निमित्ताने ज्ञानेश्वरीच्या एकेका अध्यायाचा चिकित्सक पण रसिक दृष्टीने विचार करण्याची सवय लागली होती. त्या विचार मंथनातून आणि अनेक समविचारी लोकांशी झालेल्या चर्चांमधून त्यांच्या मनात "ज्ञानेश्वरी नावाचे हे वैश्विक प्रतिभेचे चित्र आहे" हा विचार ठसत गेला आणि मग त्या विचारांचा घेतलेला संशोधनात्मक वेध म्हणजे प्रबंधात्मक पुस्तक होय.

ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेचा मोरपिसारा म्हणजे ज्ञानेश्वरी होय. या काव्यात्मक ग्रंथात संतत्त्व आणि साहित्य यांचा संगम झाला आहे. यातील कल्पनाविलास पाहताना गोविलकर बाईंच्या मनात अनेक प्रश्न निर्माण होतात. उदाहरणार्थ, यातील सगळ्या कल्पनांचे श्रेय एकट्या ज्ञानेश्वरांचे की त्यातील काही कल्पनांचे बीजांकुर इतर कुणाच्या काव्यातील आहेत का? ज्ञानेश्वर पूर्वकालीन साहित्याचे संदर्भ यात आलेले आहेत काय? इत्यादि. तरीही सर्वात महत्त्वाचा प्रश्न म्हणजे 'विवेकसिंधू', 'लीळाचरित्र' या ग्रंथाचे श्रोते समान पातळीवरचे आहेत काय? किंवा ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञानेश्वर जसे श्रोत्यांना बोलते करतात तसे विवेकसिंधूमध्ये जाणवते का? असे अनेक प्रश्न त्यांना पडले आणि त्याचा त्यांनी शोध घेतला. "गीता ते ज्ञानेश्वरी" या संदर्भातील एक शोधयात्रा त्यांना करावीशी वाटली. त्या शोधयात्रेची फलःश्रुती म्हणजे प्रस्तुत पुस्तक आहे.

ज्ञानेश्वरीसारखा अलौकिक ग्रंथ आकारास येत होता, त्या काळातील सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक वातावरणांचे प्रतिबिंब त्यात आहे का? ते प्रतिबिंब वाचकांचे

अनुक्रमणिका

लक्ष वेधून घेण्याइतपत रचनात्मक आहे का? याचा मागोवा त्यांनी घेतला आहे. मुकुंद राजाच्या 'विवेकसिंधू'ने अध्यात्मविषयक लेखनाची वाटचाल मराठी भाषेत चालू केली. ज्ञानेश्वरीच्या आधी साधारणपणे शंभर वर्षे रचलेला हा ग्रंथ ज्ञानेश्वरांनी वाचला होता, असा उल्लेख त्यांनी केला आहे. या 'विवेकसिंधू' लेखनामागची मुकुंदराजांची भूमिका तर्कमुद्रेची आहे. हा आध्यात्मिक अनुभव रसिकमुद्रेने सांगितला तर ग्रंथविस्तार होईल किंवा पाल्हाळ केल्यास अर्थच शब्दातून निसटेल अशी मुकुंदराजांची भूमिका होती. अर्थात ही भूमिका संस्कृत भाषेतील तत्त्वचर्चेच्या पद्धतीनुसार होती. पण पुढे शतकाच्या वाटचालीत साहित्यविश्वात असे काही बदल होत गेले की, ज्ञानेश्वरांनी गीतेसारखी तत्त्वचर्चा रसिकमुद्रेने कथन करण्याची प्रतिज्ञा पूर्णतेस नेली. ज्ञानेश्वरांनी 'भावार्थ-दीपिके'च्या रचनेने तर्कमुद्रेचा अवलंब न करता रसिकतेने परतत्त्वस्पर्शी अनुभवकथन सिद्ध केले.

वाचे बरवे कवित्व। कवित्वी रसिकत्व।
रसिकत्वीं परतत्व। स्पर्शु जैसा।।

अशा शब्दांमध्ये ग्रंथ निवेदनामागची आपली भूमिका ते विश्वासाने स्पष्ट करतात. हे सर्व विवेचन लीलाबाईंनी या पुस्तकात सविस्तर मांडले आहे.

महानुभाव संप्रदायाचा 'लीळाचरित्र' हा गद्य ग्रंथ 'ज्ञानेश्वरी'च्या लेखनकाळाशी अधिक जवळचा आहे. ज्ञानेश्वरांनी पद्यरूपस्वीकारले याचे कारण हा ग्रंथ समाजासमोर सांगितला गेलेला आहे. हा समाज सर्व प्रकारचा आहे. त्यामध्ये लेखन वाचनाशी परिचय नसलेला बहुजन वर्ग संख्येने अधिक असण्याची शक्यता होती. अशा समाजाला श्रवण करणे किंवा पाठांतर करणे सोईचे वाटत असावे, असा अंदाज ज्ञानेश्वरांनी केला असावा. "वाचे बरवे कवित्व." कवित्व म्हणजे पद्य. गद्य का नको याची जणू त्यांनी सूचनाच केली आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरांनी जाणीवपूर्वक पद्यरचना केली आहे, असे बाईंनी स्पष्ट केले आहे.

ज्ञानेश्वरांनी त्यांच्या काळात समाजाचे दैवत म्हणून विठ्ठलाला असलेले महत्त्व लक्षात घेतले. श्रीकृष्ण मुखातून त्याचा उल्लेख केला आणि त्याचे नाव न घेता त्रिविध कार्य साधले. एक म्हणजे देवापेक्षा भक्त श्रेष्ठ आहे. दुसरे शैव-वैष्णव संघर्षात समझोता करण्याचा भरीव प्रयत्न केला आणि सर्वात महत्त्वाचे कार्य म्हणजे जातींमधील सामाजिक विरोधाची तीव्रता कमी केली, असे त्रिविध कार्य ज्ञानेश्वरांनी कसे केले आहे, हे बाईंनी वाचकांच्या लक्षात आणून दिले आहे.

नामदेव हे त्याकाळातील बहुजन समाजातून आलेले संत नेतृत्व होते. ज्ञानेश्वरांनी हे मान्य केले होते. नामदेवांनी सुरू केलेली वारकरी संप्रदायाची बांधणी त्यांनी लक्षात घेतली होती. 'ज्ञानेश्वरी' ने या सर्वांची दखल घेतली. एवढेच नाही तर विकसित होणा-या वारकरी संप्रदायाला अत्यंत प्रभावीपणे समाजापुढे मांडले.

कृष्ण, विष्णु हरिगोविंद। या नामाचे निखळ प्रबंध
माजी आत्म चर्चा विशद। उदंड गाती
किंवा
एकाधोनि वैकुंठा जावे
ते तिही वैकुंठची केले अवघे

अशा ओव्यामधून व्यक्त केले. कर्मयोग, ज्ञानयोग, हटयोग, संन्यासयोग या सर्व मार्गांपेक्षा नामयोग कसा सहजपणे व सुलभतेने माझ्यापर्यंत आणणारा आहे, ते ज्ञानेश्वर पायरीपायरीने सांगतात. ज्ञानेश्वरीत बसवेश्वरांची शिकवण, वडील विठ्ठलपंतांचे गुरू रामानंद, अभिनवगुप्त इत्यादि भाष्यकारांचे संदर्भ येतात. नामदेवांच्या चतुरस्त्र सेतूंचे दर्शन ग्रंथाच्या सौंदर्याला वेगळी चौकट आणून देते.

"विवेकसिंधू ते ज्ञानेश्वरी" ही मराठीतील अध्यात्म-क्षेत्रातील लेखनाची चढती कमान आहे, ह्याचा धांडोळा पुढच्या प्रकरणात घेतला आहे. अललित गीतार्थाला ललितरूपामध्ये मराठीमध्ये अविष्कृत केले. गीतेचे अनुसंधान न सोडता एका स्वतंत्र ग्रंथाच्या पातळीवर ज्ञानेश्वरीला नेऊन ठेवले. शिवाय या ग्रंथात ज्ञानेश्वरांनी श्रोत्यांच्या रसिकवृत्तीला रुचणारा दुय्यमपणा येऊ दिला नाही. ही यथार्थाची अनुभूती निर्माण करण्यासाठी शांत आणि भक्तिरसाचा प्रादुर्भाव कसा केला याची मीमांसा बाईंनी सक्षमतेने केली आहे. त्यासाठी ज्ञानेश्वरांनी नागरी मराठीचा वापर केला. नामदेवांच्या अभंगवाणीतील भावलालित्याला ज्ञानेश्वरीने अभिजनाच्या साहित्याच्या आधारे तात्त्विक स्थैर्य आणून दिले.

संस्कृतमधील गीता मराठीत आणताना, ज्ञानेश्वरीने संसकृतशी कसा संबंध ठेवला यांची मार्मिक चिकित्सा केली आहे. संस्कृतच्या बदलत्या रसव्यवस्थेची प्रतिक्रिया हा या ग्रंथाचा महत्त्वाचा विशेष आहे. गीताविचाराला भक्तिरसासह शांतरसाची जोड देण्याची अभिनवता प्रथम 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथाने साध्य केली. हा बाईंच्या संशोधनाचा इत्यर्थ लक्षात येतो. ज्ञानेश्वरीच्या रचनेत गीतेतील तर्कदृष्टी, साहित्यातील ललित दृष्टी आणि लोकसाहित्याच्यावतीने जीवनातील संघर्षासमोर टिकवणारी मंत्रशक्ति या तीनही भाषा क्षेत्रीय शक्ती साकारलेल्या दिसतात, असा इत्यर्थ गोविलकर बाई या ग्रंथातून व्यक्त करतात.

ज्ञानेश्वरीची महानता समजून देण्यासाठी सोळाव्या आणि सतराव्या शतकातील दासोपंतांच्या 'गीतार्णव' आणि वामन पंडितांच्या 'यथार्थदीपिका' या ग्रंथाची तुलना केली आहे. त्यांच्या मते ज्ञानेश्वरीला चिरंजीवित्व लाभले आहे, ते केवळ त्यातील कल्पना विलासांमुळे नाही, तर ज्या वारकरी संप्रदायाने तिला आपले मानले त्यामुळे तिला शाश्वततत्त्व प्राप्त झाले आहे.

लोकभिमुखता लक्षात घेणारे "शहाणे चातुर्य" हा सुद्धा महत्त्वाचा भाग आहे. समाजाबद्दलची कळवळ्याची लाभाविण प्रीती करणारी अशी ज्ञानेश्वरांची संतांची जातकुळी आहे. त्यामुळे समाजाला आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी त्यांनी आपले वाक्चातुर्य नाट्यमयता आणि प्रसंगनिर्मितीचे कौशल्य इत्यादी कलागुणांचे सहाय्य घेतले. स्फुट ओवी-अभंगाचा हात धरून चालणा-या वारकरी समाजाला ज्ञानेश्वरीच्या रूपाने गीतेचा भक्कम आधार निर्माण करून दिला. ही समयोचितता लक्षणीय आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरी चे आकर्षण संत आणि असंत अशा सर्वांनाच वाटते, अशी कारणमीमांसा या खुलासेवार स्पष्टीकरणाने केली गेली आहे.

या पुस्तकात ज्ञानेश्वरीचे वाङ्‌मयीन वैभव 'देशियेच्या नागर' रूपामध्ये कसे प्रतीत होते, ते ही विषद केले आहे. पहिल्या दोन-तीन प्रकरणांमध्ये लीलाचरित नामदेवांची अभंगवाणी या दोन ग्रंथांबरोबर असणारे 'ज्ञानेश्वरी'चे वेगळेपण आणि साम्य तपासून पाहिले आहे. खरे तर, मराठीचे यादवकालीन भाषिक विशेष या तीन ग्रंथांच्या भाषेवरून शोधले जातात. पण या तीनही ग्रंथातील भाषेत ग्रंथाच्या भिन्न हेतुंमुळे थोड्या प्रमाणात भिन्नता आलेली आहे. लीळाचरित्रातील गद्यामधील भाषिक व काव्यात्म वैशिष्ट्ये महानुभाव पंथाचे संपूर्ण तत्त्वज्ञान पेलणारी आहेत. ग्रंथाच्या या मध्यवर्ती विशेषामुळे तिची शब्दसंपदा व भाषिक विशेष यांना एक वेगळे रूप प्राप्त झाले आहे. हा मराठी वैदर्भी देशी नागर आहे. त्या भाषेची कितीतरी उदाहरणे देऊन त्या ग्रंथाचे वेगळेपण सिद्ध केले आहे.

नामदेवांच्या अभंगामध्ये येणारी बहुजनांची मराठी बोली आहे. कीर्तने हा विशेष त्यांनी मानला. यादवकालीन समाजातील अठरापगड जातीने त्यांच्या भाषाबोलीचे अनुकरण करून भाषेची क्षमता टिकवली. मात्र त्यांच्या भाषेला संस्कृतचे वावडे नाही. भावभक्ती, रिद्धी-सिद्धी, विष्णुमूर्ती, कल्पतरू, जनकर्म असे कितीतरी संस्कृत तत्सम व तद्भव शब्द त्यांच्या अभंगवाणीमध्ये आढळतात.

या पार्श्वभूमीवर ज्ञानेश्वरी चे भाषिक स्वरूप न्याहाळले आहे. त्याचे वेगळेपण नजरेत भरण्यासारखे कसे आहे, याची असंख्य उदाहरणे दिली आहेत. ज्ञानेश्वरीतील "देशियेचेनि नागरपणे" या ओवीमधून व ज्ञानेश्वरीतील अनेक ठिकाणी आलेल्या "देशी" या शब्दावरून मराठीचे 'नागररूप' या ग्रंथात व्यक्त झालेले दिसते. त्या काळात देशी म्हणजे मराठी व या देशियेचे नागर व अनागर (ग्रामीण किंवा बोली) अशी दोन्ही रूपे प्रचारात असावीत असे म्हणता येते. त्यांपैकी ज्ञानेश्वरी सारख्या संस्कृतमधील ग्रंथाच्या अनुवादामध्ये तिचे नागररूप विशेष व्यक्त झालेले आहे, असा अर्थ बाईंनी काढला आहे व तो मान्य होण्यासारखीही आहे. त्यासाठी निवडलेली उदाहरणे देखील पटण्यासारखाच आहेत. भाषेच्या निवेदनात मराठीपण राखण्यांचे अनेक मार्ग ज्ञानेश्वरीत योजलेली आहेत. त्याची झलक प्रथमाध्यायाच्या पहिल्याच ओवीत कशी दिसते ती दाखवली आहे.

ॐ नमोजी आद्या। वेद प्रतिपाद्या
जय जय श्रीसंवेद्या। आत्मरूपा.

या ओवीत एक "जी" वगळता सर्व शब्द तत्सम आहेत. त्यांच्या "आद्या" किंवा "प्रतिपाद्या" मध्ये मराठीचा "आ" संस्कृत विसर्गाऐवजी आलेला असला तरी त्याचे संस्कृतपण लपलेले नाही. फक्त "जी" हा एकच खास






मराठी शब्द आहे. तोही "नमो" (संस्कृत नमः) ला जोडून, पण केवळ या "जी" ने ही ओवी मराठी भाषेतील आहे, हे ठसठशीतपणे लक्षात येते. हे मराठीचे नागररूप व पद्यातून कथन केलेल्या कथेचे विशेष व्यक्त करते. हा वक्ता-श्रोता संवाद असल्याने वक्तृत्वाचे विशेषही त्यास सहजतेने येतात. कथा असल्याने निवेदन, व्यक्तिचित्रण, घटनाचित्रण, संघर्ष, नाट्य इत्यादींमधून तिचे शैलीविशेष प्रगट झाले आहेत. ही वैशिष्ट्ये भाषेचे नियम कधी वाकवित मराठीला एक नवे रूप देतात.

गीतेचे हे मराठीतील अवतरण कुणासाठी याची जाणीव मध्यवर्ती ठेवून रचनाबंध निश्चित केला आणि मग रचना केली. अध्यात्म क्षेत्रातील "परतत्त्वस्पर्शी" अनुभव समोरच्या श्रोत्यांच्या आकलन कक्षेत येण्यासाठी ज्ञानेश्वरांनी गीतेसारख्या तत्त्वदर्शनपर लेखनाला गीता कहाणीचे रूप दिले. कथेचे हे लोकपरिचित व आकलनसुलभ रूप आहे, याची जाणीव त्यांना होती.

व्यासांचा "महाभारता"मध्ये गीता कथनाचा उद्देश वेगळा आहे. गीतेमध्ये महाभारताचे जीवनविषयक तत्त्वज्ञान सामावलेले आहे. गीतेच्या लेखनामागे वरवर पाहता अर्जुनाला युद्ध प्रवृत्त करण्याच्या हेतूचे निमित्त आहे. पण ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीच्या कथनाचा उद्देश वेगळा आहे. कुणालाही रणांगणावरील युद्धाला प्रवृत्त करण्याचे उद्दिष्ट ज्ञानेश्वरी कथनामागे नाही. त्यांच्या समोर असलेल्या श्रोत्यांच्या जीवनातील सामाजिक, सांस्कृतिक पातळीवरील समस्या त्यांना दिसत होत्या. सामान्यांच्या जीवनातील चांगले काय वाईट काय हा संघर्ष महत्त्वाचा असतो, हे त्यांना ठाऊक होते. न्याय, नीती, विश्वास, आधार, संस्कृती, मानवता इत्यादी मानवी संस्कृतीचे रक्षक समाजात घाबरून वावरत होते, हे त्यांना समजत होते. अशा लोकांना धर्माचे स्वरूप समजावून सांगण्याची गरज होती. नीतीच्या पायावर आधारलेल्या धर्माचे मर्म सांगण्यासाठी त्यांनी धर्म किर्तन केले. धर्म किर्तनाची ही तत्कालीन समाजाची गरज होती. ब्रह्मविद्येचा सुकाळ करण्याच्या निमित्ताने त्यांनी गीतेची गीता कहाणी घडवली.

ज्ञानेश्वरांचे हे उद्दिष्ट समजले की ज्ञानेश्वरीची महानता लक्षात येते. ज्ञानेश्वरी ही तत्त्व चर्चा नाही, तर तत्त्वचर्चेने इथे कथारूप स्वीकारले आहे. लोक साहित्यातील ही कहाणी एकट्या वक्त्याची नसते, तर ती वक्ता-श्रोता या दोघांची असते. ज्ञानेश्वरांची रचना एकतर्फी केवळ वक्त्याने बोलावे व श्रोत्यांनी ऐकावे अशी नसून ती काही प्रमाणात साद प्रतिसादाची आहे आणि मुख्य म्हणजे हे करत असताना गीतेतील यथार्थाचे रूप "पातळ" न करता ज्ञानेश्वरांनी ते साध्य केले आहे. हा यथार्थ सांगताना त्यांनी भावार्थ सौंदर्याच्या साक्षीने कसा विकसित केला आहे, याचे विश्लेषण बाईंनी अध्यायांद्वारे केले आहे, ते मुळातून वाचण्यासारखे आहे.

"गीता जेव्हा ज्ञानेश्वरी होते" या शेवटच्या प्रकरणात ज्ञानेश्वरीची वाङ्मयीन महानता त्या अशा प्रकारे समजावून देतात. साहित्याची महानता, ही ते साहित्य कोणासाठी आहे यावर अवलंबून असते. साहित्य निर्मितीतील हा प्राथमिक नियम येथे बाईंनी कसाला लावून दाखवला. एवढेच नाही तर तो सिद्ध ही करून दाखवला आहे. त्यांचे हे संशोधन गंभीर वाचकांप्रमाणेच सामान्य वाचकांना देखील 'ज्ञानेश्वरी' चे महत्त्व लक्षात आणून देणारे आहे, यात शंका नाही.

ज्ञानेश्वरीचे वाङ्मयीन वैभव -
- डॉ. लीला गोविलकर,
उत्कर्ष प्रकाशन, पुणे. २०१७,
मुल्य - रु. १५०/-












## जुने लेखन
# भिल्ल-सेवा
(१९२८)

धुळे जिल्ह्याची लोकसंख्या सुमारे बारा लाख आहे, ह्यांपैकी सुमारे ४ लाख आदिवासी आहेत. हे मुख्यतः भिल्ल आहेत आणि ते बहुतेक सर्व दृष्टींनी मागासलेले आहेत. जोपर्यंत हे सर्व लोक मागासलेले आहेत, तोंपर्यंत जिल्ह्याची सर्वांगीण उन्नती होणें कठीण आहे, कारण शरीराचा एखादा अवयव दुर्बल असला, तर सर्व शरीरावर त्याचे दुष्परिणाम दिसून येतात, त्याप्रमाणे जिल्ह्याची १/३ संख्या जर मागासलेली राहिली, तर सर्व जिल्हा इतर जिल्ह्यांच्या तुलनेने मागासलेलाच राहणार. अशी परिस्थिती असल्याने ह्या समाजाकडे माझें लक्ष वेधलें गेलें आणि मी समाजाची सेवा करण्याचें ठरविलें.

धुळे जिल्ह्यात भिल्लांची वस्ती मुख्यतः नवापुर, नंदुरबार, तकोदे, अक्कलकुवा, अक्राणी महाल आणि शहादे तालुक्यात आहे.

नंदुरबारपासून १० मैलांवर 'नटावद' ह्या नांवाचें भिल्लांचें एक गांव आहे. त्या गांवचे पुढारी, इतर गांवाच्या भिल्लांपेक्षा थोडेसे अधिक शिकलेले होते म्हणून मला वाटलें की, ह्या गांवापासूनच सुरुवात करावी.

गांधीजीचें असें मत होतें की, ज्या गांवाची आपल्याला सेवा करावयाची आहे, त्या गांवच्या लोकांनी निदान कमीत कमी आपल्या राहण्याची सोय केली पाहिजे. ह्या दृष्टीने मी तेथील पुढा-यांना समक्ष जाऊन भेटलो आणि सांगितलें की अमुक तारखेला, आपली सेवा करण्यासाठी आपल्या गांवीं राहण्याला येण्याचें योजिलें आहे तेव्हा आपण माझ्यासाठी घर पाहून ठेवावें.

१९२८ च्या मार्च महिन्यात अगाऊ ठरलेल्या तारखेला मी त्या गांवीं माझ्या सर्व सामानासह राहण्याच्या तयारीने गेलो. परंतु माझ्यासाठी कोणतेंही घर त्यांनी पाहून ठेविलेलें नव्हते, फक्त एका म्हातारीच्या घरात एका बाजूला राहण्यास मला सुचविलें. मला तेथे राहणें बिलकुल पसंत नव्हतें. मी नदीकाठीं एक महादेवाचें मंदिर आहे, तेथे राहण्याचें ठरविलें.

मंदिर होतें लहान, परंतु त्याच्या चारी बाजूला ओटा-वजा मोकळी जागा होती, म्हणून मी सामान मंदिरात ठेवलें आणि स्वयंपाक मोकळ्या जागेत करण्याचें ठरविलें. मी स्वयंपाक फक्त एकदांच दुपारी करीत असे. गव्हाचे पानगे आणि भाजी – एवढे दोनच पदार्थ मी करीत असे. भाजी नसली, तर मुगाचें वरण करीत असे. सायंकाळीं फक्त दूध घेत असे.

लोकांचा संपर्क साधण्यासाठी मी रोज गांवात जात असे. पोलीस पाटलाच्या घरीं गांवातील २०-२५ लोक जमत असत. तेथे प्रार्थना करीत असे. प्रार्थनेमध्ये प्रथम स्थितप्रज्ञाचे श्लोक म्हणत असे. नंतर श्री. नागेश वासुदेव गुणाजीकृत 'नीग्रो पुढारी बुकर टी. वॉशिंग्टन ह्यांचें चरित्र' वाचून दाखवीत असे. अशासाठी की नीग्रोंनी जशी आपली उन्नती करून घेतली, त्याप्रमाणे त्यांनीहि करावी. ह्याशिवाय श्री. मोडक ह्यांच्या 'खडे तात्त्विक बोल' ह्यापुस्तकातील एखादा विचार घेऊन त्यावर थोडेसें विवरण करीत असे. सायंकाळचा सुमारे एक तासाचा हा कार्यक्रम असे.

त्यानंतर मी मंदिरात येत असे आणि मंदिराच्या ओट्यावर प्रौढांना लिहिणें वाचणें शिकवीत असे. ह्या वर्गाला सुमारे पंधरा-वीस तरुण येत असत.

लोकांनी वस्त्रस्वावलंबी व्हावें म्हणून मी काही चरखे नंदुरबारहून मागविले आणि त्यांना त्यावर सूत कांतावयाला शिकविलें. ह्या वर्गात काही मुलें, काही स्त्रिया मिळून १५-२० जण येत असत. एका महिन्यात त्यांना त्याची चांगली गोडी लागली आहे असें दिसून आलें.

नटावदहून सुमारे ५-६ मैलांवर 'कुकुरमुंडें' ह्या नांवाचें एक गांव आहे. तेथे 'श्री. संतोजी महाराज' ह्या नावांचे एक सत्पुरुष राहत असत. ते स्वतः खादीधारी होते. त्यांचे काही शिष्य नटावदचे रहिवासी होते. लोकांनी सूत कांतून वस्त्रस्वावलंबी व्हावें अशी माझ्याप्रमाणे








त्यांचीही इच्छा होती. त्या दिशेने आपल्या भक्तांनी पहिलें पाऊल टाकावें म्हणून त्यांनी त्यांना असें सुचविलें की, 'तुम्ही स्वतः कांतलेल्या सुताच्या धोतर जोडा मला अर्पण करा.' त्यांच्या ह्या सांगण्याने वस्त्रस्वावलंबनाच्या कार्याला अधिक चालना मिळाली.

बहुतेक भिल्लमुले खरजेने-त्वचारोगाने-पिडलेले आढळून आले. मी त्यांना हिरडा, बेहडा आणि आवळकंठी देऊन त्याचें चूर्ण त्यांना बनविण्यास सांगत असे. हें चूर्ण (त्रिफळा) एक आठवडाभर घेतल्याने ते खरजेपासून मुक्त होत असत.

ह्याशिवाय लोकांना कायद्याचा सल्ला देत असे. त्यांचे अर्ज वगैरे लिहून देत असे.

पावसाळा सुरू झाल्यावर बाहेर ओट्यावर स्वयंपाक करणें अशक्य झालें तेव्हा लोकांना 'ओट्यावर मला एक झोपडी बांधून द्या' असें मी सांगितलें. भिल्ल लोक आपली झोपडी स्वतःच उभारतात, कारण बरेचसे भिल्ल मामुली सुतारीहि करू शकतात, हें मला माहित होतें. म्हणून मी गांवच्या लोकांची एक सभा बोलावली. सभेमध्ये लोकांनी असें ठरविलें की, प्रत्येक घरवाल्याने बाळुभाईच्या झोपडीच्या वाशासाठी एक एक दांडी द्यावी, ज्यांना दांडी देणें शक्य नसेल त्यांने पांच बांबू द्यावेत. कांहींनी कौलें द्यावीत. ह्या सर्व वस्तु प्रत्येक भिल्लाच्या घरीं सामान्यतः असतच. तेव्हा त्यांना ह्या वस्तु देणें अवघड नव्हतें.

झोपडीला लागणा-या वस्तूंची अशी जुळवाजुवळ झाल्याने, झोपडी उभारणें कठीण नव्हतें. सुतारी जाणणा-यांनी ह्या वस्तूंचा उपयोग करून झोपडीचा सांगाडा तयार केला. त्यानी बांबू फाडून त्याच्या कामट्या एकमेकांमध्ये गुंफून त्यांची भिंत तयार केली. तसेंच छप्परही तयार केलें. मग ह्या भिंती मातीने लिंपण्याचें काम स्त्रियांनी केलें. छप्परांवर कौलें घालण्यात येऊन तीं आच्छादण्यात आलीं. अशा रितीने झोपडी तयार झाली. ह्या झोपडीला मी 'शबरी-कुटीर' असें नांव दिलें.

महादेवाचें मंदिर हें नदीकाठीं असल्याने कधी-कधी मंदिरात आणि झोपडीत साप दिसून येत. एकदा असें घडलें की, मी नेहमीप्रमाणे पहाटेस पांच वाजण्याच्या सुमारास उठलो, कंदिल लावला आणि पाहतो, तर देवळाच्या प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूच्या दोन्ही भिंतीवर दोन साप असल्याचें आढळून आलें. मी घाबरलो. मंदिराच्या पुढून काही माणसें जात होतीं, त्यांना मी घाब-या आवाजात सांगितलें की 'साप आहेत.' तेव्हा ते म्हणाले 'थांबा. आम्ही शौचाला जाऊन येतो. मग पाहू' मी तर भांबाहून गेलो. थरथर कांपू लागलो. अंगावर रोमांच उभे राहिले. डोळ्यांतून अश्रु वाहू लागले! मी शंकराला आळविलें. शंकराचे मित्रच ते. ते काही वेळाने निघून गेले. ते गेल्यावर मग शौचाला गेलेले लोक परत आले! परंतु वरातीमाघून घोडे! अशा प्रकारचें त्यांचें तें येणें होतें.

सर्प-दर्शनाचा हा काही एकमेव प्रसंग नव्हता. झोपडीत देखील हे सर्प रात्रीं कधी-कधी दिसावयाचे. त्यासाठी कंदील बारीक करून रात्रभर जळत ठेवावा लागे. संरक्षणासाठी भिल्लांनी एक भाला दिला होता. निजतांना तो मी माझ्या खाटेजवळ ठेवीत असे. एक-दोन वेळा साप खोलीच्याबाहेर घालवून देण्याला ह्या भाल्याची मदत झाली.

एक वर्षापर्यंत भिल्ल-सेवेचें काम जेमतेम चाललें. परंतु एके दिवशीं सायंकाळच्या प्रार्थनेचा कार्यक्रम झाल्यावर मंदिरात परत येतो तों मला तेथे कोणतें दृश्य दिसलें? झोपडीच्या भोवतालच्या ओट्यावर गांवात मी दिलेले चरखेच चरखे तेथे आढळले! एवढेंच नव्हे तर रात्रीच्या साक्षरतेच्या वर्गाला कोणीहि हजर नव्हता! मी बुचकळ्यात पडलो! हें असें कां झालें? लोक माझ्यावर रागावले काय? माझ्या हातून काही चूक घडली काय? ह्याचा मी विचार करू लागलो, परंतु मला काही उलगडा होईना.

सकाळीं उठल्यावर मी इकडे तिकडे चौकशी केली तेव्हा मला असें कळलें की, काल संध्याकाळीं नेहमीप्रमाणे पोलीस पाटलाच्या घरीं प्रार्थनेचा कार्यक्रम चालू असता, गांवात अशी दौंडी पिटवली गेली की, 'ज्यांच्या ज्यांच्या जवळ बाळुभाईनी दिलेले चरखे असतील ते त्यांच्या झोपडीवर नेऊन ठेवावेत आणि कोणीहि बाळुभाईच्या रात्रीच्या वर्गाला जाऊ नये. बाळुभाई हा चहाच्या मळेवाल्यांचा एजंट आहे, तो माणसाना फूस दाखवून त्यांना मजूर म्हणून घेऊन जाण्यासाठी येथे राहिला आहे.' हें ऐकून मी तर चाटच झालो! मी गुंगच होऊन गेलो. मला काही सुचेनासें झालें. कोणाशी काही बोलण्याची

सोयच राहिली नाही!

ह्या सर्व प्रकारांवरून पुढा-यांनी माझ्या विरुद्ध चांगला कट रचला आहे असें माझ्या लक्षात आले. कारण मी नंदुरबारच्या एका वकीलाचा भाऊ आहे, हें त्यांना चांगलें माहीत होतें. असें असून त्यांनी एकीकडे माझ्या कार्यक्रमाला हजर राहण्याचें सोंग केलें आणि दुसरीकडे त्याच वेळीं दौंडी द्यायला लावून चहाच्या मळेवाल्याचा मी एजंट आहे असें जाहीर करावें आणि लोकांचा बुद्धिभेद करावा, ह्याची मला अत्यंत चीड आली!

हा प्रकार घडल्यानंतर सात दिवस गांवात सर्वत्र सामसुम होतें. मंदिरांतहि कोणी फिरकलें नाही. आठव्या दिवशीं मला असें कळलें की, गांवचें सर्व पुढारी त्यांच्या काही कामासाठी एकत्र जमले आहेत तेव्हा मी त्यांना चिठ्ठी पाठविली की, "मी आपली भेट घेऊ इच्छितो, आपण तशी परवानगी द्यावी." त्यांनी 'या' म्हणून कळविल्यावर मी तेथे गेलो.

त्यांच्याशी माझें जें बोलणें झालें, त्यावरून त्यांची मनःस्थिति मला कळून आली. त्यांच्या मनःस्थितीची कल्पना येण्यासाठी त्या पुढा-यांची थोडी माहिती देणें जरूर आहे.

हे पुढारी राजनिष्ठ होते, म्हणून सरकारची त्यांच्यावर बहाल मर्जी होती. सरकारने त्यांना भिल्ल-भिल्लांमधील खटले चालविण्याचा अधिकार दिला होता. त्यामुळे समाजामध्येही त्यांची प्रतिष्ठा होती. सरकार दरबारामध्ये त्यांना मानाचें स्थान मिळे. काही पुढारी, लोकलबोर्डाचे सरकार नियुक्त सभासदही होते.

त्या काळीं कर्मधर्म-संयोगाने महात्मा गांधीच्या तत्त्वाला अनुसरून सरदार वल्लभभाई पटेल ह्यांच्या नेतृत्वाखाली 'बारडोलीचा सत्याग्रह' चालू होता. तेथील लोकांच्या उत्पन्नावर सरकारने 'करा'ची जी आकारणी केली होती, ती अन्याय्य होती असें लोकांचें म्हणणें होतें. म्हणून त्या अन्यायाविरुद्ध हा लढा होता. ह्या लढ्यामुळे बारडोलीच्या लोकांमध्ये वीरश्री संचारली होती. 'नही नमीशुं अंग्रेज सरकारने' अशा निश्चयाने ते अहिंसक लढा लढत होते. सरकारने त्यांचें धैर्य खचावें म्हणून त्यांच्या जमिनी जप्त केल्या आणि गुरें ढोरें लीलावात काढली. लीलावात बारडोली भागांतील कोणीही तीं गुरें घेण्यास तयार नव्हते, परंतु धुळे जिल्ह्यातील दोन-चार स्वार्थी आणि देशद्रोही लोकांनी तीं घेतलीं असल्याच्या अफवा, भिल्ल पुढा-यांच्या कानीं आल्या होत्या. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे ह्या लढ्याचें स्वरूप पाहून ते थोडेसे घाबरले होते.

अशा मनःस्थितीत असतांना त्यांनी असा विचार केला की, 'हा बाळुभाई आहे गांधींचा माणूस. ह्याचें बस्तान गांवात बसत चाललें आहे.' ह्याच्या प्रवृत्ती ह्यापुढे चालू दिल्या, तर सरकार दरबारात जो आपला मान आहे, सरकारतर्फे जे अधिकार आपल्याला मिळाले आहेत, लोकांत जी प्रतिष्ठा आहे त्यांना धक्का लागण्याचा संभव आहे म्हणून बाळुभाईला नटावदहून हुसकावून लावावें! त्यासाठी त्यांनी 'बाळुभाई हा चहाच्या मळेवाल्यांचा एजंट आहे' अशी खोटीच दौंडी गांवात दिली होती. मी भयंकर माणूस आहे. असें लोकांचा भास करून माझ्या नादीं कोणी लागू नये. असा दौंडी देण्यामागे त्यांचा विचार होता.

माझ्याशी बोलतांना त्यांनी मला स्पष्ट सांगितलें की, बाळुभाई तुम्ही वस्त्रस्वावलंबनादी ज्या गोष्टीं आम्हाला करायला सांगता, त्या आम्हाला पटतात, परंतु जोंपर्यंत तुम्ही येथे आहात तोंपर्यंत आम्ही त्या करणार नाही. तुम्ही येथून निघून जां. मग आम्हाला जेव्हा योग्य वाटेल, तेव्हा 'आम्ही' करू.

मी ही सर्व घटना पू. विनोबाजींना कळविली. तेव्हा त्याचें असें उत्तर आलें की, 'ज्यांची आपण सेवा करू इच्छितो तीं जर त्यांना मान्य नसेल, तर तेथे राहण्यास काही अर्थ नाही'?

नंतर मी नटावद सोडलें आणि काही दिवस नटावदच्या नजीक लेवा पाटीदार लोकांची वस्ती असलेल्या 'कोठली' गांवीं राहिलो. तेथेही चरखा खादी वगैरेचा प्रचार केला. तेथे जम बसत चालला होता, इतक्यात १९३० सालची चळवळ सुरू झाली. तत्प्रीत्यर्थ मला धुळ्यास जावें लागलें.

**टिपा** : १) हे प्रकरण बाळूभाई मेहता यांच्या 'सेवेचे अनुभव' या आत्मचरित्रातून घेतले आहे.
प्रकाशक : परंधान प्रकाशन, पवनार, वर्धा. (१९७४)
२) बाळूभाई मेहता (जन्म १८८१) हे धुळ्याकडचे कार्यकर्ते





होते. त्यांचे शिक्षण मुंबईचे विल्सन कॉलेज व पुण्याचे फर्ग्युसन कॉलेज येथे झाले. ते एम्. ए. व एल. एल्. बी. इतके शिकले होते. टिळक युग व गांधी युग या दोन्हीचे ते साक्षीदार होते व स्वातंत्र्योत्तर काळात विनोबाजींचे अनुयायी म्हणून त्यानी काम केले.

गांधीजींच्या आश्रमात ते तीन महिने राहिले होते. १९३०, १९३२ व १९४२ या सालच्या चळवळीत त्यांनी तुरुंगवास भोगला.

३) शेवटच्या काळात हे विनोबांजींच्या सान्निध्यात ब्रह्मविद्या आश्रमात राहात होते. ❁❁❁

## लेखकांचा परिचय

- **मुखपृष्ठावरील चित्र :**

**चित्रकार -** जितेंद्र अशोक साळुंखे,

**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.
भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

- **डॉ. राजेंद्र गणेश डोळके**

मराठी विषयात विद्यावाचस्पती ही नागपूर विद्यापीठाची पदवी प्राप्त. महानुभावांचे साहित्य, संत साहित्य, विदर्भातील लेखक व विद्वान यांच्या वाङ्मयाचा दांडगा अभ्यास. प्रथम काही वर्षे मराठीचे प्राध्यापक. महाराष्ट्र बँकेतील निवृत्त अधिकारी.

***पत्ता :–*** उषःकाल ३, फ्लॅट नं १०१, प्लॉट नं. १९,२० परफेक्ट को. ऑ. हौ. सोसा. इंद्रप्रस्त नगर, मोखाडे कॉलेज समोर, नागपूर. ४४००२२. भ्रमणध्वनी : ९४२२१४६२१४.

- **प्रा. डॉ. माधव चोले.**

देगलूर महाविद्यालय देगलूर येथे राज्यशास्त्र विभागात सहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत. तसेच विदर्भ व तेलंगणा राज्यांच्या माहीतीबाबत सावित्रीबाई फुले विद्यापीठात रिसर्च.

**पत्ता :-** राज्यशास्त्र विभाग, देगलूर महाविद्यालय देगलूर ता. देगलूर जि. नांदेड. ४३१ ७१७.
E-Mail : cholemadhav@gmail.com भ्रमणध्वनी : ९९७०५६३३८५, ८१०८८१२७२७.

- **श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

**पत्ता :-** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी.
पुणे ४११ ००७. दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४६४.

- **प्रा. व्ही. डी. गायकवाड**

विभागप्रमुख, पदवी व पदव्युत्तर राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर येथे सहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत.

***पत्ता :–*** राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर, जि. लातूर–४१३५१७. (महाराष्ट्र)
भ्रमणध्वनी : ९४२३३४३४७३.

- **प्रा. डॉ. म. ई. तंगावार**

श्री हावगीस्वामी महाविद्यालय उदगीर येथे मराठी विभागाचे प्राध्यापक. वेध माणसांचा, विचारवंत ज. बाघामरे, बोध कवितेचा, जीवनगाणे, पाऊलखुणा इत्यादी पुस्तके प्रकाशित.

अनुक्रमणिका

**पत्ता :-** श्री हावगीस्वामी महाविद्यालय उदगीर, जि. लातूर-४१३५१७ भ्रमणध्वनी : ९८९००६५६९०.

**श्री. रमेश आगाशे**

निवृत्त निर्देशक, केंद्रिय भूजल बोर्ड, भारत सरकार. जिऑलॉजीचे शिक्षण पुणे येथे १९६० मध्ये पूर्ण केले. ३३ वर्षे केंद्रिय भारत सरकारच्या जलसंसाधन मंत्रालयात केंद्रिय भूजल केंद्रात कार्यरत होते.

***पत्ता :–*** ९३२ ब, यशोधन प्राईड अपार्टमेंट, शनिवार पेठ, सातारा. – ४१५००२. भ्रमणध्वनी : ९४२०४६३१८४.
E-Mail : agasheramesh36@yahoo.com

**डॉ. मृणालिनी शहा.**

मराठीच्या निवृत्त प्राध्यापिका. पुण्यातील मॉडर्न कॉलेज, पुणे विद्यापीठ या ठिकाणी त्यांनी मराठी हा विषय शिकवला. अनेक विद्यार्थ्यांना प्रबंध लेखनासाठी मार्गदर्शन केले. 'माझा प्रवास' या वरसईकर भटजी यांच्या पुस्तकाची नवी संपादित आवृत्ती तयार केली. राजहंस प्रकाशनाने ती २००७ साली प्रकाशित केली.

***पत्ता :–*** शितल अपार्टमेंट, फ्लॅट नं. १, ४६/४ १४ बी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११०
भ्रमणध्वनी : ९८९०८८९८४९.



अनुक्रमणिका

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

मनवभारतफमासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण मनवभारतफकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना मनवभारतफच्या संपादकांना द्यावी.

४. मनवभारतफमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात मनवभारतफमध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ